# नवभारत

वर्ष ४ थें ]  सप्टेंबर १९५१  [ अंक १२ वा



**किंमत १ रुपया**




नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष चौथें
अंक बारावा

# नवभारत

सप्टेंबर
१९५१

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.






संपादकीय

# 'नवभारता'चें चौथें वर्ष

या सप्टेंबर अंकाबरोबर 'नवभारता'चें चौथें वर्ष संपत आहे. येत्या ऑक्टोबर अंकापासून 'नवभारत' पांचव्या वर्षांत पदार्पण करणार.

या अंकांतच ( १९५० ऑक्टोबर ते १९५१ सप्टेंबरअखेर ) सबंध वर्षाची लेख-लेखक-सूचि दिली आहे. त्या सूचीवरून नजर टाकल्यास 'नवभारता'नें या वर्षांत चालू ठेवलेल्या व्यापक आणि विविधतासंपन्न वाङ्मयसेवेची कल्पना येऊं शकेल. राजकारण, अर्थकारण, समाजकारण, साहित्य, कला इत्यादि क्षेत्रांत ज्या महत्त्वाच्या घटना घडून येतात त्यांचा संदर्भ व त्यांत अनुस्यूत असलेली विचारसरणी समजावून घेण्याची जिज्ञासा जागरूक वाचकाला नेहमींच असते; ती त्याची जिज्ञासा तज्ज्ञांचे लेख देऊन अंशतः पुरी करणें हा 'नवभारता'चा एक हेतु आहे. 'नवभारतां'त आतांपर्यंत आलेल्या लेखांवरून, हा हेतु अमलांत आणण्याचा योजनापूर्वक प्रयत्न होत आहे, हें दिसून येईल.

या वर्षी 'नवभारता'नें कांहीं विषयांवर लेखमाला दिल्या आहेत. साहित्य, तत्त्वज्ञान, राजकारण या क्षेत्रांतील प्रभावी अशा विचारांचें मूल्यमापन होऊन विचारमंथनास मदत व्हावी हा या लेखमालांमागील हेतु आहे. अशा लेखमालांपैकीं विस्तृत अशी येऊन गेलेली लेखमाला म्हणजे 'गीता, टिळक आणि गांधी' या विषयावरील होय. या विषयावर अजून कांहीं लेख पुढें सवडीनें यावयाचे आहेत. या तात्त्विक विषयावरील लेखमाला देण्यामागील हेतु केवळ शुष्क तत्त्वचर्चा करावी हा नसून, साधनशुचितेसंबंधीं हल्लीं विचारवन्त कार्यकर्त्यांपुढें अत्यंत जिव्हाळ्याचा असा जो प्रश्न आहे, त्याबाबत एक वैचारिक आंदोलन निर्माण करून त्या प्रश्नाबाबतची विचारसरणी सुस्पष्ट करणें हा आहे, हें पूर्वी स्पष्ट केलेलेंच आहे. या विषयावर आतांपर्यंत आलेल्या लेखांवरून थोर विद्वान् विचारवन्तांचे या प्रश्नावरील दृष्टिकोन किती भिन्न, क्वचित् परस्परविरोधीहि आहेत, याची कल्पना वाचकांना आली असेल. या वादांत पूर्वपक्ष-उत्तरपक्ष ठरविणें व सैद्धान्तिक निर्णय देणें कठिण आहे व तसा लेखमाला देण्यामागील हेतुहि नाहीं. या लेखमालेनें उद्भूत केलेले प्रश्न हे जीवनदृष्टीशीं निगडित असून त्यांचा निर्णय पूर्वपक्ष-उत्तरपक्ष या वाद-पद्धतीनें लागणें शक्य नसतें. प्रत्येकजण आपापल्या ज्ञानाच्या, विचाराच्या, अनुभवाच्या कक्षेत आपापल्या सामर्थ्यानुसार आपली जीवनदृष्टि बनवीत असतो. परंतु आपल्या ठराविक वैचारिक कवचीच्या बाहेर निघून, दुसऱ्यांचे विचार प्रामाणिकपणें समजावून घेण्याची वृत्ति अंगीं बाणल्यास आपल्या ज्ञानाची, विचारांची व अनुभवांची कक्षा अधिक विस्तृत होते व जीवनदृष्टि व्यापक होण्याकडे त्याचा अवश्य परिणाम होतो. एका समकालीन थोर तत्त्वज्ञान्यानें निराळ्या संदर्भांत म्हटल्याप्रमाणें, आपल्यापेक्षां दुसऱ्याचा दृष्टिकोन समजावून घेण्यांत होणाऱ्या विचारमंथनाचा परिणाम जीवनव्यापी ठरतो : असा मुक्त विचार करणाऱ्या माणसाची बुद्धि निःपक्षपाती बनते, कृति न्यायपूर्ण होते आणि भावना अनाग्रही आणि स्नेहमय बनते. आपल्या विचारशक्तीला ठराविक बंदिस्त चाकोरींतून मुक्त करणें, इतरांचेहि पुरोगामी विचार प्रामाणिकपणें समजावून घेण्याचें तिला मुक्त स्वातंत्र्य देणें या गोष्टींची आपल्या समाजाला आज अत्यंत गरज आहे. साधनशुचितेसंबंधीं ही लेखमाला देतांनाच नव्हे, तर इतरहि विषयांवर लेख प्रसिद्ध करतांना 'नवभारता'नें अशा प्रकारें पक्षातीत धोरण ठेवण्याचा प्रयत्न केला आहे, हें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आलें असेलच.

'नवभारता'ची आर्थिक परिस्थिति समाधानकारक नाहीं. परंतु आपण करीत असलेलें मुक्त आणि उच्च विचारांच्या प्रसाराचें कार्य आज आवश्यक आहे, या ध्येयवादानें प्रेरित होऊनच 'नवभारत' प्रतिकूल परिस्थितीला तोंड देऊन तग धरण्याचा प्रयत्न करीत आहे. या प्रयत्नांत 'नवभारता'स विचारप्रेमी वाचकांनीं व लेखकांनीं सक्रिय साहाय्य करावें अशी नम्र विनंति आहे.

—वि. म. वेडेकर

अनुक्रमणिका






‘ यूनो ’च्या तज्ज्ञसमितीचा अहवाल[1] : परिचय-परामर्श— प्रा. दे. अ. दाभोलकर

# अ-प्रगत राष्ट्रांचा आर्थिक विकास

‘ आर्थिक दृष्ट्या अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक उन्नतीचे उपाय ’ या नांवाचा आंतरराष्ट्रीय तज्ज्ञांनीं तयार केलेला एक महत्त्वाचा अहवाल यूनोतर्फे नुकताच प्रकाशित करण्यांत आलेला आहे. यूनोच्या सेक्रेटरी जनरलनें हा अहवाल तयार करण्यासाठीं पुढील तज्ज्ञांची समिति नेमली होती : प्रा. कोर्टेश (चिली), प्रा. धनंजयराव गाडगीळ ( पुणें, भारत ), जॉर्ज हकीम ( लेबॅनॉन ), प्रा. आर्थर ल्यूइस ( मँचेस्टर, इंग्लंड ) व प्रा. शूल्झ ( शिकॅगो ). समितीनें जॉर्ज हकीम यांस अध्यक्ष निवडलें. अहवालाच्या बाबतींत समितीच्या सर्व सभासदांची एकवाक्यता आहे. सुमारें शंभर पृष्ठांच्या या अहवालांत एका अत्यंत जिव्हाळ्याच्या प्रश्नाचा सर्व बाजूंनीं विचार करण्यांत आलेला आहे. अर्थशास्त्राच्या अभ्यासकांना अज्ञात वा अनपेक्षित असें विशेष कांहीं या अहवालांत नसलें, तरी अधिकारी व्यक्तींनीं व्यवहारी भूमिकेवरून केलेलें सांगोपांग, सुबोध तात्त्विक विवेचन या दृष्टीनें या अहवालाची फार उपयुक्तता आहे. अशा या अहवालाचा संक्षिप्त परिचय पुढें करून दिलेला आहे.

अ-प्रगत ( Under-developed ) देश म्हणजे ‘ गरीब देश ’ ( poor countries ); ज्या देशांतून दर माणसाचें उत्पन्न उत्तर अमेरिका, कॅनडा, ऑस्ट्रेलेशिआ, आणि पाश्चिम युरोप या देशांतील दर माणशीं उत्पन्नाच्या मानानें निकृष्ट आहे, असे देश म्हणजे अ-प्रगत देश. अ-प्रगत देशांत पुढील देशांचा अंतर्भाव होतो : ( १ ) लॅटिन अमेरिका, ( २ ) ईजिप्त वगळून बाकीचा आफ्रिका, (३) ईजिप्तसह मध्यपूर्व, ( ४ ) दक्षिण मध्य-आशिआ ( यांत हिंदुस्थान, पाकिस्तान, सीलोन, मालदीव बेटें, नेपाळ, भूतान यांचा अंतर्भाव आहे ), ( ५ ) जपान वगळून अतिपूर्व ( यांत ब्रह्मदेश, चीन, फोर्मोसा बेटें, कोरिआ, मंगोलिआ, फिलिपिन, थायलंड, मलाया, इंडोनेशिआ वगैरेंचा अंतर्भाव आहे ).

## चार प्रकारची बेकारी

या अ-प्रगत राष्ट्रांत आढळून येणारी बेकारी ही चार प्रकारची असूं शकते—( १ ) जागतिक मंदीमुळें निर्माण होणारी, ( २ ) हंगामी, कांहीं विशिष्ट ऋतूंत आढळणारी, ( ३ ) उत्पादनांतील तान्त्रिक फेरबदलांमुळें उद्भवणारी व ( ४ ) जिला प्रच्छन्न बेकारी असें नांव देतां येईल अशा स्वरूपाची. स्वतंत्रपणें आपापले व्यवसाय करणाऱ्या लोकांना ज्या वेळीं पुरेसें काम मिळत नाहीं त्या वेळीं त्या वर्गांत प्रच्छन्न बेकारी वावरत आहे, असें आपण समजतों.

यांपैकीं जागतिक मंदीमुळें निर्माण होणाऱ्या बेकारीचा प्रश्न या अहवालाच्या कक्षेंत येत नाहीं. हंगामी बेकारी शेतकीप्रधान राष्ट्रांत आढळून येणें हें साहजिक आहे. कारण शेतकामाचा भर हा कांहीं विशिष्ट ऋतूंतच असतो. सर्व ऋतूंत कामाची

---

1 ‘ Measures for the Economic Development of Underdeveloped Countries ’ ( Report by a Group of Experts appointed by the Secretary-General of the United Nations, pp.108, New York, May 1951. )












अनुक्रमणिका

अधिक समविभागणी करतां येईल अशा पद्धतीनें शेतकामांची व वेगवेगळ्या पिकांची आंखणी करणें, हा अशा प्रकारच्या बेकारीवरील एक उपाय म्हणून सांगतां येईल. परंतु यानंतरहि अशा स्वरूपाची जी बेकारी शिल्लक राहील, तिच्या निवारणासाठीं कमी कामाच्या दिवसांत हातीं घेतां येण्यासारखे उद्योगधंदे शेतकऱ्याला उपलब्ध करून देणें आवश्यक आहे. या ऋतूंत करण्यासारख्या कांहीं सरकारी बांधकामांच्या योजना हातीं घेऊनहि सरकारला अशा बेकारीचें प्रमाण कमी करतां येईल. घरगुती उद्योगधंद्यांचें या दृष्टीनें महत्त्व आहे. परंतु उद्योगधंद्यांचें यांत्रिकीकरण झालें, कीं या विभागांत तिसऱ्या प्रकारची बेकारी उत्पन्न होते. यांत्रिकीकरणामुळें नवीन कामकऱ्यांना काम मिळतें ही गोष्ट खरी; परंतु त्यामुळें बेकार झालेल्या सर्व घरगुती कामकऱ्यांना काम मिळेल ही गोष्ट असंभवनीय आहे. शरीरश्रमाची बचत करणाऱ्या यांत्रिकीकरणापासून जादा लोकसंख्येच्या राष्ट्रांना विशेष फायदा उठवितां येत नाहीं. भांडवल कमी व मजूर अधिक अशा परिस्थितींत साध्या यंत्रांच्या साहाय्यानें अधिक मजुरांना काम पुरवून उत्पादन चालू ठेवणें अशा राष्ट्रांना अधिक हिताचें असतें. ज्या क्षेत्रांत यान्त्रिकीकरण केल्यास मजुरांवर त्याचा विपरीत परिणाम होणार नाहीं, अशा क्षेत्रांत यांत्रिकीकरण करावें आणि इतर क्षेत्रांत धीरे धीरे आर्थिक प्रगतीचे कार्यक्रम हातीं घ्यावेत, हेंच अशा राष्ट्रांच्या दृष्टीनें इष्ट होय. चौथ्या प्रकारच्या प्रच्छन्न बेकारीचें निवारण करावयासाठीं राष्ट्राचा संपूर्ण सर्वांगीण आर्थिक विकास साधणें, हाच एक महत्त्वाचा उपाय होय.

जादा लोकसंख्येचा परिणाम नेहमीं प्रत्यक्ष बेकारीचें स्वरूपच धारण करील असें मात्र नाहीं. मजुरीचे दर पुरेसे लवचीक असतील, तर ते खालीं जाऊन सर्वांना कांहीं ना कांहीं काम मिळूं शकेल. परंतु राष्ट्राच्या एकूण साधनसंपत्तीच्या मानानें जर मजुरांची संख्या वाजवीपेक्षां अधिक असेल तर, प्रच्छन्न स्वरूपाची बेकारी मात्र अस्तित्वांत आल्याखेरीज राहणार नाहीं. एखाद्या मोठ्या कुटुंबानें एका लहानशा जमिनीच्या तुकड्याची मशागत करून केवळ त्यावरच आपली उपजीविका करणें, अशा प्रकारच्या प्रयत्नांत ही बेकारी दडलेली आढळून येते. आशियांतील अ-प्रगत राष्ट्रांच्या शेतीव्यवसायांत वाजवीहून निदान पंचवीस टक्के तरी अधिक लोक अकारण घुटमळत राहिलेले असावेत, असा या समितीचा अंदाज आहे.

अधिक व्यवसायक्षेत्रें निर्माण करणें हाच अ-प्रगत राष्ट्रांपुढील आजचा मुख्य प्रश्न आहे. यांपैकीं बहुतेक राष्ट्रांतून नवीन जमीन लागवडीखालीं आणून शेतीचें क्षेत्र वाढविणें दुरापास्त आहे. कारण बहुतेक जमीन आधींच लागवडीखालीं आलेली आहे. या राष्ट्रांच्या आर्थिक अभ्युदयविषयक प्रयत्नांचा मुख्य भर साहजिकपणें औद्योगीकरणावरच राहील. अशा आर्थिक विकासानेंच या राष्ट्रांतील बेकारीचें निराकरण होऊं शकेल.

## अन्तर्गत उपाययोजना

अ-प्रगत राष्ट्रांचा आर्थिक अभ्युदय साधण्यासाठीं त्या राष्ट्रांत त्याविषयीं उत्साह व आत्मविश्वास असणें ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. असा उत्साह असल्यास अनेक अडचणींतून तें राष्ट्र मार्ग काढूं शकेल. या उत्साहाच्या अभावीं मात्र इतर सर्व गोष्टी विफल आहेत. हा उत्साह निर्माण करणें हें जनमनाच्या वृत्तीवर व राष्ट्रनेत्यांच्या कर्तृत्वावर अवलंबून आहे. जनतेला हिरीरीनें कार्यप्रवण करावयाचें असल्यास, आपल्या श्रमांचा मोबदला स्पष्ट स्वरूपांत आपल्यालाच मिळेल, असा विश्वास तिच्या ठिकाणीं उत्पन्न झाला पाहिजे. या दृष्टीनें जमीन कसणारा शेतकरी व कारखान्यांत काम करणारा मजूर यांना त्यांच्या श्रमांचा योग्य मोबदला मिळेल, असे कायदेकानू, रूढिरिवाज अस्तित्वांत आले पाहिजेत. त्याविरुद्ध असणारे पूर्वीचे कायदेकानू, रूढिरिवाज बदलले पाहिजेत. समाजाच्या संपूर्ण कर्तृत्वशक्तीचा उपयोग करून घेण्याच्या दृष्टीनें समाजांत जातिभेद, वर्णभेद, वंशभेद इत्यादि भेदांमुळें पडलेले तट हे मोडून टाकले पाहिजेत. अ-प्रगत राष्ट्रांत अशा सुधारणा करतांना कांहीं कटुता निर्माण होणारच. जुनीं तत्त्वज्ञानें झटकून टाकावीं लागतील; जीर्ण समाजसंस्थांचा नाश करावा लागेल; नव्या मनूशीं समरस होऊं न शकणाऱ्या कांहीं वर्गांचा परंपरागत

सुखासीन जीवनक्रम विसकटूनहि पडेल. परंतु आर्थिक अभ्युदय हवा असेल तर हें मूल्य द्यावयास सिद्ध असलें पाहिजे. अ-प्रगत राष्ट्रांपैकीं किती राष्ट्रें असें मूल्य द्यावयास तयार असतील हा एक प्रश्नच आहे.

आर्थिक अभ्युदयाच्या योजनांत महत्त्वाचा भाग अर्थातच सरकारनें उचलावयाचा असतो. सरकार कार्यक्षम असावें व सरकारी अधिकारी लांचलुचपतीपासून अलिप्त असावेत या गोष्टी आवश्यक आहेत. कोणत्याहि राष्ट्राचें सरकार या दृष्टीनें संपूर्णपणें आदर्श म्हणून दाखवितां येणार नाहीं. अ प्रगत राष्ट्रांतील सरकारांच्या बाबतींत तर याविषयीं अनेक प्रकारचे साधार प्रवाद ऐकूं येतात. परंतु ही गोष्ट ज्या त्या राष्ट्रानें आपापली सांभाळावयाची आहे. एकूण आर्थिक प्रयत्नांत सरकारनें प्रत्यक्षपणें उचलावयाचा भाग किती व खासगी प्रयत्नांवर विसंबून ठेवावयाचा भाग किती, यांविषयींचा निर्णयहि मुख्यत्वेंकरून ज्या त्या सरकारनें घेणेंच जरूरीचें आहे. प्रत्येक राष्ट्र आपापल्या परिस्थितीच्या अनुरोधानें तो निर्णय घेईल. कांहीं क्षेत्रांत मात्र सरकारनेंच कार्य करणें आवश्यक आहे. आर्थिक विकासाच्या दृष्टीनें जनतेची कार्यक्षमता वाढावी म्हणून वाहतुकीचीं साधनें, शिक्षण, आरोग्य व अशाच कांहीं इतर सुखसोयी सरकारनें जनतेला उपलब्ध करून देणें आवश्यक आहे. खासगी प्रयत्नांनीं या गोष्टी पार पडतील अशी अपेक्षा ठेवणें अर्थातच चुकीचें होईल. याखेरीज, आपल्या मालाला बाजारपेठा हेरण्यासाठीं करावयाचें संशोधन, आपल्या राष्ट्रांतील खनिज व इतर निसर्ग-संपत्तीचा शोध हीं कामेंहि सुरुवातीला तरी सरकारलाच करावीं लागतील. ज्या उद्योगधंद्यांत पडावयास भांडवलदार लोक अज्ञानामुळें किंवा नुकसानीच्या भीतीमुळें कचरतात, असे कांहीं उद्योगधंदेहि सरकारला स्वत: सुरू करून यशस्वी करून दाखवावे लागतील. जपानी सरकारनें असे उद्योगधंदे सुरू करून पुढें ते यशस्वी झाल्यानंतर खासगी भांडवलदारांच्या हातीं सोंपविले. इतर अ-प्रगत राष्ट्रांनाहि असें करावें लागेल. शेतकऱ्यांना व कांहीं वेळां उद्योगधंद्यांनाहि कर्ज देण्यासाठीं तशा पतपेढ्या सरकारला चालवाव्या लागतील. इतर उद्योगधंद्यांच्या बाबतींत खासगी लोकांची मक्तेदारी कोणत्या परिस्थितींत चालूं द्यावी व सरकारनें हस्तक्षेप करून ही मक्तेदारी आपल्या ताब्यांत केव्हां घ्यावी, याविषयींचा निर्णयहि प्रत्येक सरकारला अनेक व्यावहारिक गोष्टींचा विचार करून घ्यावा लागेल. खासगी लोकांच्या प्रयत्नांवर विसंबून ठेवलेल्या विभागांतहि उत्पादनवाढीचे प्रयत्न करणें लोकांना आकर्षक वाटेल व असे प्रयत्न सुकर होतील अशी परिस्थिति निर्माण करणें हें सरकारचें कर्तव्य आहे. जमीन कसणाऱ्याला त्याचा पुरेपूर मोबदला मिळेल असें कायद्याचें संरक्षण त्याला द्यावें; सावकार व जमीनदार यांच्याकडून त्याची होणारी पिळवणूक थांबवावी; त्याच्यावरील कर्जाचा बोजा कमी करावा; पुरेसें भांडवल त्याला पुरवावें; जमिनीच्या वांटणीमुळें पडलेले लहान लहान तुकडे पुन्हां एकत्र करून एकएका कुटुंबाला नीटपणें मशागत करतां येईल अशी आर्थिक दृष्ट्या सर्वोत्तम सोयीस्कर आकाराचीं शेतें शेतकरी कुटुंबांच्या ताब्यांत द्यावींत व शेतीविषयक इतर कामांसाठीं सहकारी मंडळ्या स्थापन कराव्यात--असे उपाय शेतीच्या बाबतींत सुचवितां येण्यासारखे आहेत. घरगुती उद्योगधंद्यांतहि सहकारी प्रयत्नांना उत्तेजन द्यावें व आधुनिक उपकरणें या कारागिरांना उपलब्ध करून द्यावींत. मोठमोठ्या उद्योगधंद्यांच्या बाबतींत कोणता कारखाना कोठें काढावा, कारखान्याचा आकार केवढा असावा, कोणत्या प्रकारचे किती कारखाने असावेत यांविषयींचें धोरणहि पण सरकारलाच आंखावें लागेल.

आर्थिक विकास म्हटला कीं त्यासाठीं यंत्रविज्ञाना-(Technology)ची अत्यन्त आवश्यकता आहे. यंत्रविज्ञानविषयक सुधारणांमुळें आपलें औद्योगिक उत्पन्न तर वाढेलच, परंतु नवीन तंत्रांच्या उपयोगानें शेतीचें उत्पन्नहि वीस वर्षांच्या काळांत सुमारें पन्नास टक्क्यांपर्यंत वाढवितां येईल, असा समितीचा अदमास आहे. परंतु अ-प्रगत राष्ट्रांत नवीन तंत्राचा सरसहा उपयोग करण्याच्या मार्गांत कांहीं अडचणी असतात. प्रगत राष्ट्रांत भांडवल अधिक व मजूर कमी अशी परिस्थिति असल्यामुळें, नवीन तंत्रें व नवीन यंत्रें उपयोगांत आणून कमी मजुरांवर आपलें काम कसें भागवितां येईल, याविषयींचा त्यांचा विचार चालू असतो. याउलट,

अ-प्रगत राष्ट्रांत जादा लोकसंख्येमुळें मजूर अधिक व गरिबीमुळें भांडवल कमी अशी स्थिति असल्यामुळें, कमी भांडवल व अधिक मजूर वापरणारीं तंत्रें व उपकरणें अशा राष्ट्रांना अधिक उपयुक्त असतात. यामुळें प्रगत राष्ट्रांचीं तंत्रें जशींच्या तशीं स्वीकारुन अ-प्रगत राष्ट्रांचें चालणार नाहीं. पुरेशा तन्त्रज्ञांचा अभाव ही दुसरी एक अडचण आहेच. परदेशांतील तन्त्रज्ञ सुलभपणें व थोडक्या पगारांत मिळण्यासारखे नाहींत. प्रत्येक राष्ट्रानें यासाठीं आपले तन्त्रज्ञ शिकवून तयार केले पाहिजेत. असे तन्त्रज्ञहि एक वेळ लवकर तयार होऊं शकतील. परंतु 'योजकस्तत्र दुर्लभः' ही याहूनहि मोठी अडचण आहे. एकाद्या क्षेत्रांतील कामाचा आटोप आणि उरक असणारा योजक अधिकारिवर्ग त्या त्या क्षेत्रांत काम करुन व अनुभवानें तयार होतो. योजक कार्यकुशल असेल तर तो इतर उणीवांचा परिणामहि तितकासा जाणवूं देणार नाहीं. कांहीं अ-प्रगत राष्ट्रांतून योजक नेत्यांचा वर्ग समाजाच्या कांहीं विभागांतूनच, जातींतूनच, सध्यां पुढें येतो, ही गोष्टहि विशेषशी इष्ट नाहीं. समाजांतील इतर थरांतील व्यक्तींचा विकास होऊन त्यांची कर्तबगारीहि राष्ट्राच्या उपयोगी पडली पाहिजे. परकीय भांडवलदार ज्या ठिकाणीं कारखाने चालवीत असतील, त्यांनींहि त्या त्या राष्ट्रांत तद्देशीयांना असें शिक्षण देण्याची आपली जबाबदारी उचलली पाहिजे.

नवीन तन्त्रांचें सामान्य ज्ञान जनतेला मिळेल व त्या तन्त्राचा उपयोग करावयास ती तयार होईल अशा प्रकारचें शिक्षणहि जनतेला मिळणें आवश्यक आहे. जनतेच्या नेहमींच्या गरजा भागविण्या साठीं विशेष अभ्यास केलेले तन्त्रज्ञच प्रत्येक ठिकाणीं लागतील असें नाहीं. शेतीचे दररोज उद्भवणारे प्रश्न, साधीं बांधकामें, साधें वैद्यक या अशा गोष्टींसाठीं एक-दोन वर्षें शिक्षण घेतलेले लोकहि चालूं शकतील. अशा प्रकारच्या शिक्षणाची सोय अ-प्रगत राष्ट्रांनीं अवश्य करावी. अ-प्रगत राष्ट्रांतून काम करणाऱ्या आन्तरराष्ट्रीय संस्थांनींहि अशा लोकांचा उपयोग करुन घ्यावा.

आर्थिक विकासासाठीं भांडवलाची जरुरी असते, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. प्रगत राष्ट्रांतून राष्ट्रीय उत्पन्नापैकीं दहा टक्क्यांहून अधिक उत्पन्नाची भांडवल म्हणून बचत होत असते. अ-प्रगत राष्ट्रांत हें प्रमाण शेंकडा ५ टक्क्यांहूनहि कमी आहे. (यांतच परकीयांनीं अ-प्रगत राष्ट्रांत गुंतविलेल्या भांडवलाचाहि समावेश आहे.) कांहीं अ-प्रगत राष्ट्रांतून तर भांडवलाच्या बचतीचें प्रमाण लोकसंख्येच्या वाढीच्या प्रमाणाशीं जवळजवळ सम असें आहे. यामुळें राष्ट्रांतील लोकांच्या रहाणीचें मान वाढणें दूरापास्त झालें आहे. भांडवलाची निर्मिति अधिक प्रमाणांत कशी करतां येईल, हा अ-प्रगत राष्ट्रांपुढील एक अत्यंत निकडीचा प्रश्न होऊन बसला आहे.

अ-प्रगत राष्ट्रांतील जनतेकडे असणाऱ्या खासगी सुवर्णसांठ्यांतून कांहीं भांडवल जमा करतां येईल. कांहीं राष्ट्रांतून तर एकूण राष्ट्रीय उत्पन्नाच्या दहा टक्के किंमतीइतकें सुवर्ण लोकांच्याकडे सांठ्याच्या रुपानें असावें असा अंदाज करण्यांत आला आहे. परंतु एक तर हें सर्व सोनें सरकारच्या हातीं येणें अवघड आहे. आणि आलें तरी एकूण गरजेच्या मानानें त्याचें महत्त्व कमीच. कांहीं अ-प्रगत राष्ट्रांतील सरकारांकडे किंवा पतपेढ्यांच्याकडे असणारे सुवर्णसांठेहि कांहीं प्रमाणांत उपयोगांत आणतां येण्याची शक्यता आहे. परंतु यापासूनहि कांहीं विशेष भांडवलाची निष्पत्ति होईल असें नाहीं. परदेशी भांडवल कितपत उपयोगी पडूं शकेल याचा विचार पुढें केला आहे. तेव्हां अन्तर्गत भांडवलउभारणीसाठीं मुख्य भर राष्ट्रांतील बचत वाढविण्यावरच दिला पाहिजे. यासाठीं एक तर बचत करणें सुलभ व्हावें व केलेल्या बचतीचा नवीन भांडवलनिर्मितीकडे उपयोग करण्याची लोकांना इच्छा व्हावी अशा प्रकारच्या सोयी-तरतुदी सरकारनें केल्या पाहिजेत. नाहीं तर लोक बचत करणार नाहींत, किंवा केली तरी केवळ सुवर्णाच्या रुपांत करतील किंवा जमीनखरेदीच्यामागें लागून जमिनीच्या किंमती वाढवून ठेवतील. नवीन उत्पादन-वाढीच्या दृष्टीनें या बचतीचा उपयोग व्हावयाचा असेल तर, उद्योगधंद्यांत तिची गुंतवण झाली पाहिजे. या दिशेनें सरकारनें आपलें धोरण आंखावयास हवें.

दुसरा मार्ग म्हणजे करुपानें लोकांच्याकडून पैसे गोळा करण्याचा होय. गरीब लोकशाही

राष्ट्रांत अशा मार्गानें पैसा उभारणें फारच अवघड असतें. कारण आधींच खालीं असलेलें जीवनमान आणखी निकृष्ट अवस्थेस नेण्यास जनतेचा साहजिकच विरोध असतो. मध्यमवर्गावर कर लादणें हेंहि सोपें नसतें. कारण तन्त्रज्ञ, शास्त्रज्ञ, अधिकारी हे मुख्यत्वेंकरून या वर्गांतून येत असल्यामुळें, या वर्गाला फार नाराज करणें हितावह नसतें. श्रीमंत वर्गावर कर लादण्यास पुष्कळ सवड असते व तसे कर लादणें एकूण सामाजिक समतेच्या दृष्टीनें इष्टहि आहे. परंतु या करांचा भांडवलनिर्मितीवर काय परिणाम होईल हें सांगणें अवघड आहे. कारण या कराच्या बोजामुळें आपल्या चैनी कमी करण्याऐवजीं आपल्या बचतीचें प्रमाण हा वर्ग कमी करील अशी भीति असते. सर्व चैनीच्या वस्तूंच्या व्यापार-वापरावर नियंत्रणें घालून, कर लादून सरकारला या गोष्टीला कांहींसा आळा मात्र घालतां येणें शक्य आहे.

बचतीचा आणखी एक मार्ग म्हणजे राष्ट्राचें सर्व वाढतें उत्पन्न बचत म्हणून वापरणें हा होय. हा मार्ग अनुसरला असतां जनतेच्या रहाणीचें मान कांहीं काळ वाढवितां येत नाहीं. परंतु त्या मानांत कांहीं घट होत नसल्यामुळें, ही गोष्ट जनतेला तितकीशी जाणवत नाहीं. राष्ट्राचें उत्पन्न वाढत असतां राष्ट्राची लोकसंख्याहि त्याच प्रमाणांत वाढत राहिली तर, मात्र अशा प्रकारची बचतहि अवघड होऊन बसते; कारण जुनें जीवनमान टिकविण्यासाठींच त्या वाढत्या उत्पन्नाचा व्यय करावा लागतो.

राष्ट्राच्या निर्यात मालाचे परदेशांतील भाव वाढले तर, त्याचा फायदा कांहीं खासगी व्यापाऱ्यांना मिळूं देण्यापेक्षां तो नफा कररूपानें सरकारनें आपल्याकडे घ्यावा, अशी एक योजना सुचविण्यांत येते. या योजनेनेंहि कांहीं पैसा उभा करतां येईल. परंतु कांहीं दिवस तेजीचे त्याचप्रमाणें कांहीं मंदीचे असतात हें मात्र ध्यानांत वागविलें पाहिजे.

लोकांच्याकडून सवडीच्या काळांत उपयुक्त कामें करून घेणें हाहि अशा भांडवलनिर्मितीचाच एक प्रकार होईल. आपले रस्ते करणें, शाळा बांधणें, विहिरी खोदणें, झाडें लावणें अशीं कामें खेडेगांवांतील लोकांना करतां येतील. यायोगें उत्पादन तर वाढेलच, परंतु शिवाय जनतेंत नवचैतन्यहि निर्माण होईल. असें नवचैतन्य निर्माण करणें ही आर्थिक विकासाच्या दृष्टीनें एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे.

चलनवाढ करून भांडवलनिर्मिति करण्याचा उपायहि सुचण्यासारखा आहे. हा उपाय आकर्षक असला तरी अतिशय धोक्याचा आहे. चलनवाढीचा परिणाम भरमसाट किंमती वाढण्यांत होऊन त्यापासून एकूण अनहितच अधिक होतें. चलनवाढीच्या मदतीनें उपभोगाच्या वस्तूंचें उत्पादनहि त्याच प्रमाणांत वाढवितां आलें, तर चलनाच्या वाढीच्या गतीशीं उपभोग्य वस्तूंच्या पुरवठ्याची समगति राहिल्यामुळें, किंमतींत वाढ होऊं शकणार नाहीं. तेव्हां शेतीवरील जादा मजूर काढून घेऊन उपभोगाच्या वस्तूंच्या निर्मितीसाठीं त्यांचा उपयोग करावा व या मजुरांची मजुरी चलनवाढ करून द्यावी असें सांगतां येईल. परंतु अशा मजुरांनाहि उत्पादनासाठीं कांहीं भांडवल हें लागतेंच व चलनवाढीचे दुष्परिणाम टाळून तें कसें पुरवावें हा मोठाच बिकट प्रश्न आहे. बाहेरून भांडवलाची मदत मिळाल्यास हा प्रश्न अधिक सुकरपणें सोडवितां येईल.

या सर्व अ-प्रगत राष्ट्रांतून लोकसंख्या झपाट्यानें वाढत आहे. जन्माचें प्रमाण तसेंच राहून मृत्यूचें प्रमाण मात्र घटत चाललें आहे. नवीन वैद्यकीय शोधांमुळें व आरोग्यसाधनांच्या प्रसारामुळें मृत्यूचें प्रमाण साहजिकच असेंच घटत जाईल. परंतु जन्माच्या प्रमाणांत जर घट झाली नाहीं, तर मात्र राष्ट्राचें उत्पादन वाढवूनहि वाढत्या लोकसंख्येला चढतें राहणीचें मान उपलब्ध करून देणें फारच दुष्कर होऊन बसेल. तेव्हां या दृष्टीनें आवश्यक व शक्य ती उपाययोजना त्या त्या राष्ट्रांनीं व याविषयांतील तज्ज्ञांनीं अंमलांत आणली पाहिजे.

अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक विकासाच्या योजना आंखतांना पुढील जोडगोष्टींचा विचार करावा लागतो : ( १ ) उपभोगासाठीं उत्पादन व भांडवलनिर्मितीसाठीं उत्पादन. ( २ ) जनतेच्या कार्यशक्तीचा विकास व भौतिक उत्पादनसाधनांची वाढ. ( ३ ) सरकारनें करावयाचीं कामें व इतर कामें. ( ४ ) आर्थिक स्वयंपूर्णता व आन्तरराष्ट्रीय व्यापार ( ५ ) उद्योगधंदे व शेती.—या प्रत्येक



अनुक्रमणिका






जोडीच्या दोन घटकांतील विकासांत परस्परविरोध आहे असें वाटलें तरी, हा विरोध अगदीं अनिवार्य आहे असें नाहीं. एकासाठीं दुसऱ्याचा पूर्णपणें त्याग करण्याची आवश्यकता नाहीं. सर्वांगीण विकास साधत असतां प्रत्येक जोडींतील दोन्हीहि घटकांकडे पुरेसें लक्ष देतां येईल. प्रत्येक जोडींतील घटकांच्या तरतम महत्त्वाविषयीं निश्चित कल्पना बाळगणें एवढेंच योजनाबद्ध विकासाच्या दृष्टीनें आवश्यक आहे.

वरील द्वंद्वांपैकीं पहिलें द्वंद्व सोडवितांना जनतेचें जीवनमान अगदींच निकृष्ट अवस्थेला जाऊन पोहोंचणार नाहीं, इतकें तरी उपभोगांच्या वस्तूंचें उत्पादन चालू ठेवणें जरूरीचें आहे. यानंतर उपभोग व भांडवलनिर्मिति यांमधील सीमारेषा कोठें काढावी हें राष्ट्राच्या एकूण धोरणावर अवलंबून राहील. बाहेरून भांडवली मदत मिळण्याच्या शक्याशक्यतेवरहि याबाबतींतला निर्णय बराचसा अवलंबून असेल. दुसऱ्या द्वंद्वाविषयीं असें सांगतां येईल कीं, अ-प्रगत राष्ट्रांत जनतेची शारीरिक व मानसिक कार्यशक्ति वाढविण्यासाठीं कांहीं रक्कम खर्च करणें हें इतर भौतिक उत्पादनसाधनांच्या वृद्धीसाठीं करावयाच्या खर्चाइतकेंच, किंबहुना कांहींसें अधिकच महत्त्वाचें आहे. या खर्चाचा सुपरिणाम प्रत्यक्ष व्यवहारांतहि दिसूं शकेल. कारण जनतेच्या वाढलेल्या कार्यशक्तीमुळें राष्ट्राच्या एकूण उत्पादनांत भर पडल्याखेरीज राहणार नाहीं. अ-प्रगत राष्ट्रांनीं या दृष्टीनें शिक्षण, आरोग्य इत्यादि गोष्टींवरील आपले खर्च वाढविले पाहिजेत. अ-प्रगत राष्ट्रें आपल्या आर्थिक विकासाच्या योजना आंखतांना या मूलभूत गोष्टींकडे अनेकदां दुर्लक्ष करतांना आढळतात. तिसऱ्या द्वंद्वांत कांहीं सरकारी सार्वजनिक कामें एकूण राष्ट्राच्या आर्थिक विकासाला पायाभूत म्हणूनच हातीं घ्यावयास हवींत. वाहतूक, दळणवळणाचीं साधनें, पाणीपुरवठा, वीजनिर्मिति या अशा गोष्टी आहेत; त्या उपलब्ध नसल्या तर सारा विकासच अडून राहील. या प्रकारच्या खर्चाची आंखणी करतांना खालील गोष्टींकडे मात्र लक्ष पुरवावयास हवें : ( १ ) या खर्चामुळें शेती व इतर उद्योगधंदे यांना द्यावयाच्या आवश्यक सरकारी मदतींत कपात करण्याचा प्रसंग येऊं नये. ( २ ) आपल्याकडे भांडवलाचा तुटवडा आहे हें लक्षांत ठेवून एकाच योजनेच्या काटेकोर परिपूर्तीवर अवास्तव खर्च करण्यापेक्षां, अनेक योजना साध्या चालचलाऊ होतील अशा पद्धतीनें पुऱ्या करून घ्याव्यात. ( ३ ) हीं बांधकामें राजधानीच्या आसपास किंवा नजरेंत भरतील अशा ठिकाणींच व्हावयाचा अधिक संभव असतो. पण तसें होऊं देऊं नये. शक्य तितकें विकेंद्रीकरण हेंच इष्ट आहे. ( ४ ) सरकारी कामावर असणाऱ्या नोकरवर्गाला मिळणारें वेतन हें बाहेरील वेतनाहून अधिक असतें. याचा बोजा सर्व जनतेला सहन करावा लागतो इकडे लक्ष ठेवावें. ( ५ ) खेडेगांवांना आपापलीं कांहीं कामें मुख्यत्वें करून स्वावलंबनानें पार पाडावयाचें शिक्षण द्यावें.— चौथ्या द्वंद्वाविषयीं दोन साध्या सरळ गोष्टी सांगतां येतील. दुसऱ्या राष्ट्रांकडून माल आयात केल्यानें आपल्या राष्ट्राचा एकूण अधिक फायदा होत आहे कीं नाहीं हें पाहून आपलें आयातविषयक धोरण ठरविणें चांगलें. तसेंच प्रगत राष्ट्रांकडून आवश्यक ती यन्त्रसामग्री व इतर साधनसामग्री खरेदी करावयाची असल्यास, त्यांना आपला माल निर्यात करणें अपरिहार्य आहे हें ओळखूनच, अ-प्रगत राष्ट्रांना आपलें निर्यातविषयक धोरण आंखावें लागेल. पांचव्या द्वंद्वाची उकल करतांना शेती व घरगुती उद्योगधंदे यांचें अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक जीवनांतील महत्त्व आपण ध्यानांत ठेविलें पाहिजे. मोठ्या प्रमाणावरील यन्त्रोत्पादन सरसहा तावडतोब सुरु केलें, तर जादा लोकसंख्यांच्या या राष्ट्रांतून बेकारीचा प्रश्न अधिक भीषण झाल्याखेरीज राहणार नाहीं.

या सर्व गोष्टींचा निर्णय घेऊन योजना आंखून ती पार पाडावयाची असेल, तर त्यासाठीं पुरेसें जागरूक व सामर्थ्यवान् सरकार राष्ट्रांत असावयास पाहिजे. योजनाबद्ध विकासासाठीं आपल्या राष्ट्रांत असणाऱ्या आवश्यक अशा निसर्गसंपत्तीचें ज्ञानहि आज अनेक अ-प्रगत राष्ट्रांना नाहीं. यासाठीं स्वकीय व परकीय तज्ज्ञांच्या मदतीनें प्राथमिक पाहणीचें काम पुरें करावयास हवें. याचप्रमाणें योजना आंखतांना एका आर्थिक क्षेत्रांतील हालचालींचा अन्य



अनुक्रमणिका






आर्थिक क्षेत्रांवर काय परिणाम होईल, आज परिस्थिति काय आहे व योजना पूर्ण झाल्यानंतर परिस्थिति काय असेल, यांविषयीं सावधानता बाळगावयास हवी. सर्व विभागांतील प्रगतीची समगति राखण्यासाठीं कांहीं नियंत्रण आवश्यक राहील. हरएक लहानलहान बाबतींतील नियंत्रण आवांक्याबाहेरील असेल तर, कांहीं केंद्रीभूत महत्त्वाच्या गोष्टींवरच नीट नियंत्रण ठेवून एकूण राष्ट्राच्या सर्व अर्थजीवनाला पुरेसें वळण लावतां येईल.

योजना आंखतांना व योजना पार पाडतांना शक्य तितकें विकेन्द्रीकरणच हितावह आहे. लहानलहान प्रदेशांनीं, प्रांतांनीं आपल्या योजना पाठवाव्यात. त्यापासून मध्यवर्ती योजना तयार करावी व निरनिराळ्या प्रान्तिक व प्रादेशिक नियोजनमंडळांकडून त्या योजनेची अंमलबजावणी होण्याचें कार्य व्हावें.

## आन्तरराष्ट्रीय उपाययोजना

अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक जीवनांत आन्तरराष्ट्रीय व्यापाराचें महत्त्व फार असतें. साधारण सरासरीनें पाहतां राष्ट्रीय उत्पन्नाच्या सुमारें २० टक्के किंमतीचा माल हीं राष्ट्रें निर्यात करतात. ही निर्यातहि अनेक राष्ट्रांतून मुख्यत्वेंकरून कोणत्यातरी कच्च्या मालाची असते. या कच्च्या मालाच्या बदल्यांत प्रगत राष्ट्रांकडून तयार माल हीं राष्ट्रें घेत असतात. या स्थितींत खालील अडचणी निर्माण होतात : ( १ ) एकाच पदार्थाच्या निर्यातीवर मुख्यत्वेंकरून विसंबून राहिल्यामुळें, त्या पदार्थाच्या किंमतींतील फेरफार राष्ट्राच्या अर्थजीवनावर मोठा परिणाम करूं शकतात. ( २ ) जागतिक मंदीच्या काळांत कच्च्या मालाच्या किंमती या तयार मालाच्या किंमतीहूनहि अधिक प्रमाणांत खालीं घसरत असल्यामुळें कच्चा माल व तयार माल यांतील विनिमयाचें पारडें कच्च्या मालाच्या विरुद्ध दिशेला झुकतें. पूर्वीइतकाच तयार माल घेण्यासाठीं पूर्वीहून अधिक कच्चा माल द्यावा लागतो. ( ३ ) १८७३ ते १९३७ हा कालखंड पाहिला तर मंदीखेरीज इतर काळांतहि हें विनिमयाचें पारडें उत्तरोत्तर कच्च्या मालाच्या विरुद्धच झुकत चाललेलें आढळून येईल. या सर्व गोष्टी लक्षांत ठेवून अ-प्रगत राष्ट्रांना आपलें व्यापारविषयक धोरण ठरवावें लागेल.

या संबंधांत प्रगत राष्ट्रांनींहि अ-प्रगत राष्ट्रांना मदत करावयाची आपली जबाबदारी उचलली पाहिजे. यासाठीं अशा राष्ट्रांनीं हट्टानें आपण कच्च्या मालाचें उत्पादन करणें किंवा कच्च्या मालाची निर्यात करणें या गोष्टी थांबविल्या पाहिजेत. उत्पादनासाठीं यन्त्रसामग्री व इतर आवश्यक साधनें अ-प्रगत राष्ट्रांना योग्य वेळीं योग्य प्रमाणांत उपलब्ध होत रहातील अशी तजवीज करणें, हीहि प्रगत राष्ट्रांवरील एक जबाबदारी आहे. या गोष्टी लक्षांत घेऊनच जगाच्या आन्तरराष्ट्रीय व्यापारविषयक धोरणाची आंखणी झाली पाहिजे.

या सर्व योजना पार पाडण्यासाठीं परकीय भांडवल किती लागेल याचेंहि अंदाजपत्रक समितीनें बनविलें आहे. आज जगांतील अ-प्रगत राष्ट्रांची एकूण लोकसंख्या १५३ कोटी आहे. ही लोकसंख्या दरवर्षी सरासरी १·२५ टक्क्यांच्या वेगानें वाढत आहे. या राष्ट्रांतील जनतेचें राहणीचें मान जर दरवर्षीं दोन टक्के या प्रमाणांत वर न्यावयाचें असेल, तर वार्षिक सुमारें १९०० कोटी डॉलर्सचें भांडवल गुंतविलें पाहिजे. यापैकीं १५०० कोटी डॉलर्स औद्योगीकरणावर खर्च होतील व ४०० कोटी डॉलर्स शेतीसुधारणेला उपयोगी पडतील. केवळ १५ कोटी लोकसंख्येचें अमेरिकन राष्ट्र दरवर्षी २५०० ते ३००० कोटी डॉलर्सची भांडवलनिर्मिति करीत आहे, हें लक्षांत घेतल्यास १९०० कोटींचा आंकडा कांहीं फार मोठा वाटावयास नको ! परंतु याबरोबरच अ-प्रगत राष्ट्रांना औद्योगीकरण व शेतीसुधारणा यांखेरीज इतर गोष्टींसाठींहि बरेंचसें भांडवल लागेल, हें विसरतां कामा नये.

आवश्यक अशा १९०० कोटी डॉलर्सपैकीं ५२० कोटी डॉलर्सच्या भांडवलाची उभारणी अ-प्रगत राष्ट्रें स्वतःच्या प्रयत्नानें करूं शकतील. उरलेल्या १३८० कोटी डॉलर्सची मदत मात्र बाहेरून मिळवावी लागेल. पश्चिम यूरोपांतील राष्ट्रें, ऑस्ट्रेलिया, अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें व कॅनडा या सर्व राष्ट्रांचें मिळून एकूण वार्षिक उत्पन्न ३५००० कोटी डॉलर्सचें आहे. यापैकीं केवळ दोन टक्के उत्पन्नाचा विनियोग अ-प्रगत राष्ट्रांना भांडवल पुरविण्यासाठीं केला, तरीहि त्या राष्ट्रांची

गरज भागूं शकेल. १९०५ ते १९१३ या काळांत ब्रिटन आपल्या राष्ट्रीय उत्पन्नापैकीं ७ टक्के भाग परदेशांत भांडवलरूपानें गुंतवीत असे. अमेरिकाहि गेल्या पांच वर्षांत मदत किंवा कर्ज म्हणून आपल्या राष्ट्रीय उत्पन्नापैकीं तीन टक्के भाग बाहेर पाठवीत आली आहे. तेव्हां दोन टक्क्यांची अपेक्षा अवास्तव वाटण्याचें कारण नाहीं.

परकीय भांडवल तीन मार्गांनीं उपलब्ध होऊं शकतें : ( १ ) परकीय खासगी भांडवलदार, बँका व इन्शुअरन्स कंपन्या यांनीं गुंतविलेलें भांडवल, ( २ ) आंतरराष्ट्रीय बँकेकडून मिळणारें कर्ज, ( ३ ) परकीय सरकारनें केलेली मदत. यांपैकीं पहिल्या मार्गाचा विचार करतां, परकीय भांडवलदारवर्गाचे घटक इतर राष्ट्रांतील खासगी उद्योगधंद्यांतून आपलें भांडवल गुंतविण्यास उत्सुक नाहींत असें दिसतें. असें भांडवल जेव्हां गुंतविलें जातें तेव्हां तें साधारणपणें स्वतःच्या राष्ट्रांत असणाऱ्या कारखान्यांचे उप-कारखाने किंवा पूरक कारखाने परदेशांत काढण्या-साठींच मुख्यत्वेंकरून गुंतविलें जातें. अशा भांडवला-वर भांडवल देणाऱ्या देशांतील मूळ कारखान्यांचें पूर्ण नियंत्रण राहतें. आज अशा भांडवलाची गुंतवण मुख्यत्वेंकरून (सुमारें शेंकडा ७०) तेलाच्या उत्पादनासाठीं केली जात आहे.

दुसऱ्या व तिसऱ्या मार्गांतील घटक एके काळीं परराष्ट्रांतील सरकारांना कर्जें द्यावयास उत्सुक असत. १९३० च्या मंदींत कांहीं सरकारांना दिलेलीं कर्जें बुडीत खातीं जमा झाल्यामुळें आतां हेंहि औत्सुक्य मावळलें आहे. अमेरिकेंतील कित्येक इन्शुअरन्स कंपन्यांना तर परराष्ट्रांत अशी गुंतवण करण्यास बंदी करण्यांत आलेली आहे. ही बंदी उठविण्यांत आल्यास काम कांहींसें सुकर होईल.

खासगी परकीय भांडवलाच्या गुंतवणींत इतरहि अडचणी आहेत. त्या अशा : ( १ ) कांहीं अ-प्रगत राष्ट्रांना परकीय भांडवल स्वीकारण्याची भीति वाटते. कांहीं वेळां ही भीति अज्ञानमूलक असते; कांहीं वेळां हा एक नुसता दुराग्रह असतो. यामुळें आफ्रिकेंतील अनेक अ-प्रगत राष्ट्रें परकीय भांडवल स्वीकारण्याच्या विरुद्ध आहेत. ( २ ) खुद्द अमेरिकेंत भांडवल गुंतविल्यास अमेरिकन भांडवलदारांना १९४८ मध्यें शेंकडा १४ इतका नफा सुटत असे. परदेशीं गुंतविलेल्या भांडवलावर हें प्रमाण शेंकडा १७ इतकें होतें. ही नफ्याची अपेक्षा अनेक अ-प्रगत राष्ट्रांना डोईजड वाटते. ( ३ ) अनेक राष्ट्रांतून सरकारी कायद्यामुळें खासगी भांडवल गुंतविण्याचीं क्षेत्रें मर्यादित झालेलीं आहेत. ( ४ ) परकीय सरकारचें धोरण कसें राहील याविषयींहि भांडवलदारांना निश्चिति वाटत नाहीं. दोन्ही राष्ट्रांच्या सरकारांनीं करारमदार करून या बाबतींत निश्चिति निर्माण करणें अगत्याचें आहे. असे करार करावयास अमेरिकेनें सुरुवात केली आहे ही स्वाग-तार्ह गोष्ट होय. ( ५ ) परदेशांत मिळालेला नफा स्वराष्ट्रांत आणावयाचा तर त्यासाठीं हुंडणावळीची तशी सोय पाहिजे; नाहींतर नफा परराष्ट्रांतच अडकून पडेल. ( ६ ) या नफ्याच्या मिळकतीवर दोन्ही-कडेहि कर भरावा लागेल अशी भांडवलदारांना भीति वाटते

अमेरिकेंतील 'एक्स्पोर्ट-इंपोर्ट (आयात-निर्यात) बँक' ही परदेशांत भांडवल गुंतविण्याचा व्यवहार फार मोठ्या प्रमाणावर करते. आजवर हिच्याकडून मुख्यत्वेंकरून अमेरिका खंडांतील अ-प्रगत राष्ट्रांना भांडवल पुरविलें जात असे. अलीकडे जगांतील इतर राष्ट्रांतूनहि तिनें भांडवल गुंतवावयास सुरुवात केली आहे ही चांगली गोष्ट आहे. इतर प्रगत राष्ट्रांतूनहि अशाच बँका अस्तित्वांत आल्यास इष्ट होईल.

आंतरराष्ट्रीय बँकेची स्थापनाच मुख्यत्वेंकरून अ-प्रगत राष्ट्रांच्या आर्थिक विकासाला मदत करण्याच्या हेतूनें करण्यांत आली. ही बँक दरवर्षी सुमारें ३० कोटी डॉलर्सचें कर्ज अ-प्रगत राष्ट्रांना देत असते. एकूण गरजेच्या मानानें ही रक्कम अगदीं-च अपुरी आहे, ही गोष्ट उघड आहे. या संस्थेनें आपल्या कार्याची व्याप्ति वाढविली पाहिजे. जवळ-जवळ १०० कोटी डॉलर्सचें तरी कर्ज प्रतिवर्षी या बँकेकडून अ-प्रगत राष्ट्रांना मिळत गेलें पाहिजे.

भांडवलाच्या गुंतवणीच्या मार्गांत दुसरी एक महत्त्वाची अडचण उभी असते. भांडवलाच्या यशस्वी गुंतवणीसाठींदेखील एक प्रकारची भूमि तयार व्हावी लागते. सगळ्याच बाजूंनीं मागासले-








त्या राष्ट्राला भांडवल पुरविलें, तरी त्याला त्याचा नीट उपयोग करतां येणार नाहीं. निसर्गसंपत्तीची पाहणी, आंखीव योजना, पुरेसे तन्त्रज्ञ, सुशिक्षित, सुदृढ कामगारवर्ग या गोष्टी भांडवलाची गुंतवण फलदायी व्हावयाला आवश्यक असतात. या गोष्टींचा विकास करून आर्थिक विकासाचा पाया भक्कम करावा लागतो. यासाठीं जवळजवळ ३०० कोटी डॉलर्सचा वार्षिक खर्च अ-प्रगत राष्ट्रांतून करणें जरूर आहे. हा खर्च करण्याची, किंबहुना यासाठीं कर्जें उभारण्याची देखील शक्ति अ-प्रगत राष्ट्रांच्या ठायीं आज नाहीं. प्रगत राष्ट्रांनीं मदत म्हणूनच ही रक्कम अ-प्रगत राष्ट्रांना देणें हितावह आहे. प्रगत राष्ट्रांच्या वार्षिक उत्पन्नाच्या १ टक्क्याहूनहि कमी असणारा हा बोजा त्या राष्ट्रांनीं स्वीकारणें जागतिक हिताचें होईल. अमेरिकेनें पश्चिम यूरोपला केलेल्या मदतीहून ही अपेक्षा कितीतरी कमी आहे. आणि पश्चिम युरोपची पुनर्रचना आतां जवळजवळ पूर्ण झाली असल्यामुळें आपल्या मदतीचा ओघ अ-प्रगत राष्ट्रांकडे वळविणें अमेरिकेला जड जाऊं नये. या दृष्टीनें योजना आंखण्यासाठीं एखादें अधिकार-संपन्न आन्तरराष्ट्रीय नियोजनमंडळ नेमणें अगत्याचें आहे, असें समितीला वाटतें. दिलेली मदत नीट कारणीं लागत आहे कीं नाहीं, याविषयींहि या मंडळाला दक्षता बाळगतां येईल.

अ-प्रगत राष्ट्रांचा प्रश्न हा जगांतील बहुसंख्य जनतेचा आजचा निकडीचा प्रश्न होऊन बसलेला आहे. तो तावडतोब तांतडीनें सुटेल अशी अपेक्षा करणें चूक होईल. परंतु तो शक्य तितक्या लवकर सुटावा म्हणून प्रयत्न करणें आपल्या हातीं आहे. यासाठीं अ-प्रगत राष्ट्रांना जागरूकपणें प्रामाणिक प्रयत्नांची शिकस्त करावी लागेल आणि प्रगत राष्ट्रांनाहि सुजाणपणें या प्रयत्नांतील आपला आवश्यक भार उचलावा लागेल. अखिल जगाच्या कर्तृत्व-शक्तीच्या कसोटीचा हा प्रसंग आहे.

## समितीच्या कार्यक्षेत्राच्या मर्यादा

ऐतिहासिक घटनांमुळें सगळ्या जगाच्या अर्थकारणांत एकसूत्रता आणणें, निदान त्यांतील विसंवादित्व कमी करणें, हें आजच्या काळांत एक निकडीचें आणि महत्त्वाचें कार्य होऊन बसलें आहे. अ-प्रगत राष्ट्रांचें औद्योगीकरण होत असतांना प्रगत राष्ट्रांतील उद्योगधंद्यांशीं होणाऱ्या त्यांच्या संघर्षाची तीव्रता कमी कशी करतां येईल, अ-प्रगत राष्ट्रांचा आर्थिक विकास एकूण जगाच्या आर्थिक घडीशीं सुसंवादी कसा राखतां येईल, याचें स्पष्ट विवेचन या अहवालांत आलें असतें तर बरें झालें असतें. तिसऱ्या महायुद्धाची संभाव्यता, त्याचे आर्थिक उन्नतीच्या योजनांवर होणारे तात्कालिक व चिरंतन संभाव्य परिणाम व त्यांसंबंधीं अ-प्रगत राष्ट्रांनीं बाळगावयाची दक्षता याविषयींहि मार्गदर्शन आज आवश्यक आहे. तसें मार्गदर्शन या अहवालांत नाहीं. परंतु याबद्दल तज्ज्ञसमितीला दोष लावणें योग्य होणार नाहीं. कारण, एक तर तिसरें महायुद्ध केव्हां होईल व झालें तर त्यानंतर जगाची परिस्थिति काय राहील, याविषयीं निश्चित कांहीं सांगणें जगांत आज कोणालाहि अशक्य आहे. दुसरें असें कीं, यूनोतर्फे नेमलेल्या समितीनें तिसऱ्या महायुद्धाच्या संभाव्यतेची वाटाघाट करणें हेंहि कदाचित् अनुचित ठरलें असतें. परंतु कोणतीहि योजना आंखतांना नियोजकांना मात्र तिसऱ्या महायुद्धाची ही टांगती तलवार विसरून चालणार नाहीं. संरक्षणखात्यावरील खर्च, अमेरिकेच्या मदतीमध्यें अनुस्यूत असणारा अमेरिकेचा सोव्हिएटविरोधी आग्रह, युद्धोपयोगी वस्तूंच्या उत्पादनामुळें इतर उत्पादनांत पडणारा तुटवडा अशा प्रत्यक्ष अडचणी तिसऱ्या महायुद्धाच्या संभाव्यतेचा विसर पडावा म्हटलें तरी पडूं देणार नाहींत.

आजच्या अर्थकारणावर राजकारणाची घनदाट छाया पडलेली आहे. आशियांतील अ-प्रगत राष्ट्रांतील राजकारण तर फारच अस्थिर, गुंतागुंतीचें व ज्वालाग्राही झालें आहे. यांत अंतर्गत राजकीय पक्षोपपक्षांचें राजकारण, शेजारच्या राष्ट्रांशीं असणारे कलह, जागतिक राजकीय गटबाजींत राष्ट्राची केली जाणारी ओढाताण व तिसऱ्या महायुद्धाची निरन्तर संभाव्यता या सर्व गोष्टींचा समावेश होतो. आर्थिक दुरवस्थेमुळें राजकीय अस्वस्थता व राजकीय अ-स्वस्थतेमुळें आर्थिक दुरवस्था असें कांहींसें दुष्टचक्रहि या ठिकाणीं निर्माण झालेलें आहे. हरप्रयत्नानें आर्थिक विकास करून जनतेचें जीवनमान वरच्या पातळीला नेणें हाच एक हें दुष्टचक्र सोडविण्याचा








मार्ग आहे. यासाठीं जराशी तरी अनुकूल अशी परिस्थिति व समयज्ञ नेतृत्व यांची अत्यंत आवश्यकता आहे.

समितीचा अहवाल हा केवळ अ-प्रगत राष्ट्रांच्या दृष्टिकोणांतून विचार करून लिहिला गेलेला आहे. समितीनें सुचविलेल्या उपाययोजनांत आन्तरराष्ट्रीय स्वरूपाच्या ज्या योजना सांगितलेल्या आहेत, त्यांचा भार मुख्यत्वेंकरून अमेरिकेवरच पडणार हें उघड आहे. प्रगत राष्ट्रांत इंग्लंड, पश्चिम यूरोपमधील राष्ट्रें, ऑस्ट्रेलिया, कॅनडा या राष्ट्रांचाहि समावेश जरी केला व त्या राष्ट्रांकडून कांहीं मदतीची अपेक्षाहि जरी ठेविली, तरी आर्थिक मदतीचा मुख्य भार अमेरिकेलाच उचलावयास पाहिजे, हें सांगावयास नको. कोलंबो-योजनेच्या आंखणींत अमेरिकेभोंवतीं याचनेची जी एक दुरून प्रदक्षिणा घालण्यांत आली, तीहून अहवालांत सूचित झालेल्या प्रदक्षिणेचें वर्तुळ अधिक जवळचें आहे. हें अपरिहार्यहि आहे, कारण अमेरिकेचें साहाय्य हेंच अ प्रगत राष्ट्रांच्या जलद आर्थिक विकासाचें आजचें एकमेव आशास्थान आहे. परंतु म्हणूनच या उपाययोजनेविषयीं अमेरिकेला साधारणपणें काय वाटेल याविषयींचा विचार करावयास हवा. केवळ अमेरिकेंत २५०० ते ३००० कोटी डॉलर्सची भांडवलनिर्मिति दरवर्षी होते, म्हणून त्या राष्ट्रका बाह्य जगाला १३८० कोटी डॉलर्सची मदत करतां येईल का ? यूरोपला मिळणारी मदत यापुढें अ-प्रगत राष्ट्रांना द्यावी असें म्हटलें, तर यूरोपच्या मदतीच्या मागें असलेलें राजकारण अ-प्रगत राष्ट्रांना रुचेल काय ? अमेरिकेंत शेंकडा १४ इतका नफा भांडवलावर सुटत असतां केवळ तीन टक्के अधिक नफ्यासाठीं सध्यांच्या अस्थिर परिस्थितींत परदेशीं भांडवल गुंतविण्याचा धोका अमेरिकेंतील भांडवलदारांनीं काय म्हणून पत्करावा ? अमेरिकेंतील इन्शुअरन्स कंपन्यांना परदेशीं भांडवल गुंतविण्याची मुभा द्यावी अशी सूचना करतांना, तें भांडवल सुरक्षित राहीलच अशी हमी मिळूं शकेल, अशीहि कांहीं तरतूद करावयास नको काय ? परदेशीं गुंतविलेल्या भांडवलावरील नफ्यावर, ज्या राष्ट्रांत तें भांडवल गुंतविलें असेल त्या राष्ट्रानें कर घ्यावा, ज्या राष्ट्राचें तें भांडवल असेल त्यानें पुन्हां त्यावर कर लावूं नये, ही सूचना तरी भांडवल गुंतविणाऱ्या राष्ट्रांनीं जशीच्या तशी कां मान्य करावी ? आंतरराष्ट्रीय बँकेनें आपलीं कर्जें वार्षिक ३० कोटी डॉलर्स पासून १०० कोटी डॉलर्सपर्यंत न्यावींत, पुरेसें परदेशाचें चलन उपलब्ध असण्याच्या प्रश्नाला दुय्यम महत्त्वाचें स्थान द्यावें—या सूचनांचाहि प्रत्यक्ष भार अमेरिकेलाच सहन करावा लागणार आहे.

प्रत्येक अ-प्रगत राष्ट्रांतील परिस्थितीचा तपशीलवार सखोल अभ्यास करून सूचना करणें समितीच्या कार्यक्षेत्राच्या कक्षेंत नव्हतें व समितीला दिलेला दोन महिन्यांचा अवधि हाहि त्या दृष्टीनें अगदींच अपुरा होता. परंतु अशा उपाययोजना यशस्वी होण्याच्या दृष्टीनें अशा अभ्यासाची अत्यंत आवश्यकता आहे. अ-प्रगत राष्ट्रांतून पुरेशी आवश्यक माहिती संकलित झालेली नसल्यामुळेंहि असा अभ्यास करणें अवघड होऊन बसतें. पूर्व यूरोपांतील अ-प्रगत राष्ट्रांचा अभ्यास करण्याचा असा प्रयत्न १९४३ सालीं सुरू करण्यांत आला. चॅथॅम हाऊसतर्फे डॉ. रोझेन-स्टाईन रोडान यांच्या मार्गदर्शनाखालीं हें काम हातीं घेण्यांत आलें. जगांतील इतर अनेक अ-प्रगत राष्ट्रांच्या मानानें पूर्व यूरोपांतील राष्ट्रांच्या बाबतींत युद्धपूर्वकालीन माहितीचे बरेच आंकडे उपलब्ध होते. पुढें अनेक अडचणींमुळें या कामांत खंड पडला. झालेलें कामहि पूर्णपणें अद्याप प्रसिद्ध झालेलें नाहीं. परंतु त्या कामाविषयींची जी माहिती बाहेर आली आहे, त्यावरून त्या कामाचें महत्त्व लक्षांत येतें. ( जिज्ञासूंनीं ' International Affairs ' च्या जानेवारी १९५१ च्या अंकांतील ' The Economic Development of Eastern Europe ' हा लेख पाहावा. ) अ-प्रगत राष्ट्रांचा आर्थिक विकास हा त्या त्या राष्ट्राच्या मूळ प्रकृतीला धरूनच व्हावयास पाहिजे व त्या दृष्टीनें घरगुती उद्योगधंदे वगैरेंचें त्यांत स्थान राहील असा एक महत्त्वाचा निष्कर्ष या संशोधनांतून बाहेर पडलेला आहे. अ-प्रगत राष्ट्रांना आपल्या अर्थजीवनाचें संशोधन करण्यास चॅथॅम हाऊसनें केलेल्या या अभ्यासाचा आदर्श म्हणून उपयोग करतां येईल.

---










ख्वाजा अहमद अब्बास. अनु. वि. ग. जोशी

# अल्लाची मेहेरबानी!

[1]नाहीं, साहेब. कोणाविरुद्ध चहाडीचुगली नाहीं. नातेवाईक, दोस्त, वैरी, सगेसोयरे, अधिकारी, मालक कोणाहि विरुद्ध कांहीं चहाडी नाहीं. सरकारची निंदा नाहीं कीं अल्लाविरुद्ध कागाळी नाहीं. ईश्वराला मान्य असेल तेंच घडणार. दैवाचं लिहिणं कोणी झालं तरी कसं बदलणार ! म्हणून मी माझ्या दैवावर संतुष्ट आहे. आणि सकाळ-संध्याकाळ अल्लाचे आभार मानतों कीं, खायला पुलाव-कोरमा नाहीं, तरी निदान चटणी-भाकरी तरी तो पाठवतोच. डोक्यावर आकाशाशिवाय छत नाहीं म्हणून काय झालं ? झोंपायला फूटपाथचे दगड तर आहेत ! माझा तुटलेला पाय पाहून अनुकंपा दाखवूं नका, साहेब. खुदाची मर्जी आहे, दुसरा पाय तर नीट आहे !

खरं विचाराल तर संतोष हाच आम्हां गरिबांचा सर्वांत मोठा ठेवा. संतोष आमच्या स्त्रियांचा दागिना आहे आणि आमच्या मुलांचं खेळणं आहे. तुम्हां बंगल्यांत, महालांत राहणाऱ्यांना संतोषाचे फायदे काय समजणार ! वाळलेल्या भाकरीबरोबर संतोषाची चटणी लावून खाल्ली तर सबंध कोंबडं खाल्ल्याचा आनंद मिळतो. नंतर सडकेच्या कडेला संतोषाची मखमाली गादी पसरून वरून संतोषाची रेशमी चादर पांघरून झोंपा. एखाद्या राजाला, नबाबालाहि लागत नसेल अशी झोंप लागते ! आणखी तर ऐका. जेव्हां मशीनमध्यें सांपडून माझा डावा पाय तुटला आणि मिल-मालकांनीं नुकसानभरपाई देण्याचं नाकारलं आणि जुन्यापान्या वस्तू विकणाऱ्या दुकानदाराकडून मी दोन रुपयांत ही तुटलेली कुबडी खरेदी केली आणि धडपडत, उड्या मारीत मारीत, लंगडत, नकली भाग तयार करण्यांत निपुण असणाऱ्या एका डॉक्टरकडे गेलों आणि त्यानं रबरी पाय लावण्यासाठीं एक हजार रुपये आणि लांकडी पाय लावण्यासाठीं पांचशें रुपये मागितले व माझ्या खिशांतून फक्त सात रुपये निघाले, तेव्हां तुम्हांला काय वाटतं, मीं काय केलं असेन ? रबराचा पाय लावला नाहीं कीं लांकडाचा पाय लावला नाहीं. संतोषाचा पाय लावून टाकला ! त्या दिवसापासून आजतागायत ती तुटलेली कुबडी आणि संतोषाचा पाय यांवरच दिवस घालविले. संतोष असल्यावर कुबडीचीहि कांहीं जरूरी लागत नाहीं, साहेब ! अल्लानं हात दिले आहेत, कुल्ले दिले आहेत. तिकडे समोर तर पाहा. त्या लुळ्या रुल्दूच्या दोन्ही तंगड्या निरुपयोगी आहेत. तरी पण हात आणि कुल्ले यांच्या साहाय्यानं तो घसटत घसटत चालतोच आणि अल्लाचे आभार मानतो, कीं तंगड्यां-बरोबरच हातांवर तरी संकट आलं नाहीं !

खुदाची मेहेरबानी, लहानपणींच आईबापांकडून संतोषाचा धडा मिळाला. आम्ही जातीनं विणकर आहोंत, साहेब. तसं पाहिलं तर मुसलमानांत कांहीं जातपात नसते, खुदाचे दास सगळे सारखेच. पण

---

१ ही लघुकथा मूळ हिंदीमध्यें ‘ सरगम ’ मासिकाच्या फेब्रुवारी १९५१ च्या अंकांत प्रसिद्ध झाली आहे. ‘ सरगम ’ मासिकाचे संपादक आणि या लघुकथेचे लेखक श्री. ख्वाजा अहमद अब्बास यांनीं हा अनुवाद ‘नवभारतां’त प्रसिद्ध करण्यास परवानगी दिली याबद्दल आभारी आहोंत.—का. सं.








श्रीमंत-गरीब, उंच-नीच मोठेपणा-साधेपणा तर अल्लानंच निर्माण केला आहे. म्हणूनच माझा बाप म्हणायचा कीं, माणसानं आपली पायरी कधींहि विसरूं नये आणि त्याच मार्गाप्रमाणं तो वागायचा-हि. म्हातारा झाला तरी मोठ्या लोकांच्या नोकरांना-सुद्धां लवून सलाम करायचा. प्रत्येक पठाणाला 'खानसाहेब', प्रत्येक सय्यदाला 'मीरसाहेब', प्रत्येक व्यापाऱ्याला 'लालाजी', प्रत्येक ब्राह्मणाला 'पंडितजी' आणि लहानांतल्या लहान अधिकाऱ्यां-ना, अगदीं कुलकर्णी-पाटलांपर्यंत सर्वांना, 'सरकार' म्हणायचा ! पण, ते सर्वजण त्याला 'बुंदू जुलाहा' म्हणूनच हांक मारायचे. या श्रीमंत मोठ्या लोकांच्या मुलांना स्वच्छ कपडे घालून, हातांत पुस्तकं घेऊन शाळेला जातांना पाहिलं कीं, आम्हां भावांनाहि वाटायचं कीं, आमचेहि कपडे असेच असावेत आणि आम्हीहि शिकून-सवरून अधिकारी व्हावं. पण, माझा बाप समजवायचा, "बेटा, आपली कुवत विसरूं नये. खुदानें जो दर्जा दिला आहे, त्याच्यावर संतोषानं, आनंदानं राहिलं पाहिजे. नाहीं तर 'घरांत नाहीं दाणा आणि मला हवालदार म्हणा' या म्हणीसारखी स्थिति होईल." माझ्या बापाच्या स्मरणांत बऱ्याच म्हणी होत्या आणि जशी वेळ सांपडेल तशी तो कोणती ना कोणती तरी म्हण ऐकवायचा.

आम्ही ज्या वेळीं शहरांतल्या आडतीच्या व्यापाऱ्यासाठीं घोंगड्या विणीत होतों त्या वेळची गोष्ट. तो आम्हांला लोंकर आणि प्रत्येक घोंगड्याची कताई आणि विणाई म्हणून दीड रुपया द्यायचा आणि तेंच घोंगडं बाजारांत दहा रुपये, अकरा रुपये किंमतीला विकायचा. हो, त्या वर्षीं ईदच्या वेळीं बाबाला आडत्याकडून रक्कम मिळाली नाहीं. खरी गोष्ट ही होती कीं, त्या वर्षीं विलायतेंतील आणि जपानमधील मशीनवर तयार झालेल्या फैंसासारख्या नाजुक घोंगड्या स्वस्त दरांत आल्या होत्या आणि आमच्या मुजफ्फरनगरांतील घोंगड्यांची मागणी कमी झाली होती. शेंकडों घोंगड्या तशाच विकायच्या राहिल्या होत्या आणि स्वतः आमच्या आडत्यानं विलायती घोंगड्यांची एजन्सी घेतला होती. हो, माझ्या बाबाला पन्नास-साठ घोंगड्यांची विणकामाची मजुरी मिळाली नाहीं तेव्हां तो तरी बिचारा ईदला कपडे कोठून आणणार ? तेच मागल्या वर्षीचे ईदचे कपडे आईनं घरीं साबणानं धुऊन आम्हांला दिले. जेव्हां आम्ही आमच्या शेजारच्या वकीलसाहेबांच्या मुलांनीं रेशमी अंगरखे आणि नव्या तुर्की टोप्या घातलेल्या पाहिल्या, तेव्हां आम्हांला रडूं कोसळलं ! पण बाबा म्हणाला-"अरे, रडतायू काय ? ते श्रीमंत लोक आपल्या रुबाबांत गुंग आहेत, तर आम्ही गरीब आमच्या गरीबींत मस्त आहोंत !" ही गोष्ट माझ्या मनांत कायमची ठसली. त्या दिवशीं व आजहि जेव्हां मी एखाद्या श्रीमंत धनवानाला उंची कपडे घालून घमेंडींत चालतांना पाहतों, तेव्हां लगेच माझ्या स्थितींतहि मी मस्त होऊन जातों !

हं, साहेब ! मी मोठा झालों तेव्हां कांहीं वर्षं बापाबरोबर कापड विणण्याचं काम करीत होतों. पण जेव्हां आमच्या धंद्यांत मंदी आली तेव्हां माझ्या बापानं पाटलाकडून शिफारस करवून मला मामलेदारसाहेबांकडे नोकरीस लावलं. मामलेदारसाहेब शहराच्या बाहेर जवळच तालुक्याच्या हद्दींत एका बंगल्यांत राहत होते. त्यांचं नांव होतं खां कुद्रतुल्ला खां. मोठे रुबाबदार. मोठ्या लांब लांब मिशा. आवाज तर असा कीं, कोणाला दम भरला कीं लघवीच व्हायची ! सर्व शहर त्यांना घाबरायचं ! त्यांच्याकडे मीच एकटा नोकर होतों. कचेरींतले दोन नोकर कचेरीच्या वेळाशिवाय वरचं काम करीत. पण घरचं सर्व काम मलाच पाहावं लागत असे. जेवण तयार करण्यासाठीं एक म्हातारी दोन वेळेला यायची. पण झाडून काढणं, रोज खोलींतल्या टेबल-खुर्च्या पुसणं, झटकणं, मामलेदार-साहेबांना दर पंधरावीस मिनिटांनीं हुक्का भरून देणं, भांडीं घासणं, अंथरुणं घालणं, बाजारहाट करणं हीं सर्व माझीं कामं होतीं. आणि हो, या सर्व कामांशिवाय एक दुसरंहि काम होतं. तें म्हणजे मामलेदारांच्या मुलीचीं, बानोचीं पुस्तकं घेऊन तिला शाळेंत सोडून यायचं. मुलीची शाळा कांहीं फार लांब नव्हती. बंगल्यापासून फार तर अर्धा मैल असेल आणि शेतांतून गेलं तर त्याहूनहि कमी. पण त्यांच्या मुलीनं स्वतः पुस्तकं घेऊन जायचं हें








# अल्लाची मेहेरबानी !

मामलेदारसाहेबांच्या प्रतिष्ठेला शोभणारं नव्हतं. म्हणून बानोला शाळेंत पोंचविणं आणि तेथून परत आणणं हें माझं काम होतं. आणि खरं म्हणाल तर मला सर्व कामांत हेंच काम आवडायचं ! त्या वेळीं मी कांहीं तरी सतरा-अठरा वर्षांचा असेन, साहेब. खुदाच्या कृपेनं रूपानीपहि वाईट नव्हतं आणि प्रकृतीहि चांगली होती. शिवाय मामलेदारसाहेबांनीं दोन-चार जुने अंगरखे आणि विजारी दिल्या होत्या आणि माझ्या आईनं त्या कापून शिवून नीट केल्या होत्या. ते कपडे घालून आणि केंसांना कडक तेल लावून मीहि चांगल्यापैकीं जंटलमन दिसायचा. बानो शाळेला जातांना बुरखा घ्यायची, पण माझ्याशीं पडदा पाळायची नाहीं. मामलेदारसाहेब बुरख्याच्या बाबतींत तसे फार कडक होते. पण त्यांचं म्हणणं असं कीं, नोकराबरोबर पडदा कशाला ? आणि ते हे शब्द असे म्हणायचे कीं जसं कोणी तरी म्हणावं, घरच्या कुत्र्याबरोबर पडदा कशाला, अगर घोड्याबरोबर पडदा कशाला !

हं, तर साहेब, बानो माझ्याशीं वागतांना पडदा पाळायची नाहीं. पंधरा-सोळा वर्षांची असेल. सातवीची परीक्षा देणार होती ती. तिच्याविषयीं काय सांगूं ? मला तुमच्याशीं अशा गोष्टी बोलतांना लाज वाटते ! पण, एवढं समजा कीं अल्लानं खास आपल्या हातानं बानोला तयार केलं होतं. रंग तर अगदीं मैदा आणि मधासारखा आणि काळ्या रेशमी बुरख्यांतून आपला चेहरा बाहेर काढून ती माझ्याकडे पाहून स्मित करायची तेव्हां वाटायचं कीं, ढगांतून चंद्रच बाहेर पडला आहे ! कुरळे केंस, मोठे मोठे कटोऱ्यासारखे डोळे. मी तरी माणूसच होतों ना, सरकार ! तशांत तारुण्याचा बहर. देवदूतांनीं जरी तिला एकदांच पाहिलं असतं तरी ते ब्रह्मचर्य साफ विसरले असते ! परंतु ती होती मालकाची मुलगी आणि मी पडलों नोकर. कधीं असं कांहीं तरी वाटायला लागलं कीं मी विचार करायचा : “ अरे बुंदू जुलाह्याच्या पोरा, कां उगीच वेडा होतोस ? आपली कुवत विसरूं नकोस, नाहीं तर इतके जोडे खावे लागतील, कीं टक्कल पडेल, समजलास ! ” आणि हा विचार मनांत येतांच सरकार माझी गुर्मी कुठं तरी निघून जात असे ! पण सरकार, खोटं कशाला बोलूं ? दुसऱ्या दिवशीं जेव्हां बानो-बरोबर शाळेला जाण्यासाठीं मी तिचीं पुस्तकं घेऊन शेतांतून जायला लागें आणि इकडेतिकडे कोणी नाहीं असं पाहून ती बुरखा काढून टाकी आणि तिच्या केंसांचा मंद मधुर सुवास हवेंत पसरे, त्या वेळीं सैतान पुन्हां मला भुलविण्यास सुरुवात करी आणि सांगे-“ अरे, तूं नोकर नाहींस आणि ती मालकाची मुलगीहि नाहीं. तूंहि तरुण आहेस आणि तीहि तरुण आहे. ”

तसं पाहिलं तर बानो मामलेदारसाहेबांची एकुलती एक मुलगी होती आणि फार लाडकी. तिच्यासाठीं जगांतल्या सगळ्या सुखसोयी तयार होत्या. पण खरंच ती फार दुःखी होती. गोष्ट अशी कीं तिची आई वारल्यावर मामलेदार-साहेबांनीं दुसरं लग्न केलं होतं. सावत्र आई म्हणजे, आपणांला माहीतच आहे सरकार, एक ब्यादच असते ! पण ही मामलेदाराची दुसरी बायको खानम तर फारच वाईट होती. सावत्र मुलीला एक क्षणभर सुखी पाहणं तिला कठिण होतं. पण होती फार चलाख. जोंपर्यंत मामलेदारसाहेब घरीं राहत, तोंपर्यंत त्यांना दिसावं म्हणून बानोबरोबर गोडगोड बोलायची; पण ते कचेरींत जाण्यासाठीं बाहेर निघाले कीं हिनं दुसरं रूप प्रकट केलंच ! दरएक गोष्टीवरून बानोला बोलायची. बिचारीला मारायची-सुद्धां ! एके दिवशीं सकाळीं खानमनं आपल्या लहान मुलाचीं हागमुतानं भरलेलीं अंथरुणं, दुपटीं धुवायला बानोला सांगितलं. ती बिचारी शाळेचं काम करीत होती, जरा उशीर झाला. खानम कोठींतून सैपाकीणबाईला कणीक मोजून देऊन बाहेर आली तर तिला हगरींमुतरीं दुपटीं तशींच पडलेलीं दिसलीं. बस ! मग काय आगच भडकली. तिनं बानोच्या हातांतली शाळेची वही हिसकावून घेऊन तिचे तुकडे तुकडे केले आणि तिची वेणी धरून तिला फरफटत आपल्या खोलींत घेऊन गेली आणि तिथं पलंगाचा पाय उचलून तिचा हात त्याच्या खालीं दाबून स्वतः पलंगावर चढली आणि म्हणायला लागली कीं, जोंपर्यंत तूं माफी मागणार नाहींस, नाक घासणार नाहींस, तोंपर्यंत मी तुला सोडणार






नाहीं.' पण बानोहि पक्की हट्टी होती. दांत आवळून बसून राहिली ती. रडली नाहीं, मुसमुसली नाहीं कीं तिनें माफी मागितली नाहीं. जेव्हां खानमचा मुलगा रडायला लागला, तेव्हां तीच उठली. मी पडवींतल्या पडद्यांतून पाहात होतों आणि वाटत होतं, कीं जावं आणि या खानमला जितं मारून टाकावं! जेव्हां तिला खोलीच्या बाहेर जातांना मीं पाहिलं तेव्हां माझ्या जिवांत जीव आला. पण आतां स्वतःच पलंगाचा पाय बाजूस सारण्याइतकीहि ताकद बानोच्या हातांत नव्हती. हें पाहून मी खानमच्या भीतीनें घाबरत घाबरत खोलींत गेलों आणि ताबडतोब पलंगाचा पाय उचलला. त्या वेळच्या बानोच्या नजरेचं काय वर्णन करूं, सरकार? एखाद्या घायाळ हरिणीला एखाद्यानं, कापण्यापूर्वींच कसायाच्या हातांतून सोडवावं ना, तशी ती वाटत होती. पाहतां पाहतां तिच्या डोळ्यांत अश्रू जमा झाले आणि पुढं तर काय ती माझ्या खांद्यावर डोकं टेकून मुसमुसत होती. आपणच सांगा, अशा वेळीं कोणी झालं तरी काय करणार? माझा तर श्वास वरचा वर आणि खालचा खालींच राहिला. "छोटी बीबी, असं काय करतां? खानम पाहील तर, माझं चामडं लोळवील!"—मी हळूच म्हणालों. इतक्यांत भिंतीवर लावलेल्या घड्याळानं साडेनऊचे टोले दिले तेव्हां मी म्हणालों, "शाळेला जायची वेळ झाली." शाळेचं नांव ऐकतांच बानोचं मुसमुसणं थांबलं आणि माझ्या ओल्या खांद्यावरून डोकं उचलून ती म्हणाली, "चल ममदू, माझीं पुस्तकं घे. आज माझ्या हातांत टांक धरायचीहि ताकद नाहीं." त्या दिवशीं बानो शाळेला जायला निघाली तेव्हां बुरख्याच्या आंत एक गांठोडं तिनं लपविलेलं मला दिसलं. शाळेच्या रस्त्याला लागल्यावर बानोनं नेहमींप्रमाणं बुरखा काढून टाकला. रस्ता शेतांतल्या पायवाटेनं जात होता. इकडे तिकडे पाहून ती म्हणाली, "ममदू, या छळानं तर मी मरून जाईन!"

मी म्हणालों, "होय, छोटी बीबी! ही खानम फार वाईट आहे."

"मग?" आणि असं म्हणून तिनं माझ्याकडे अशा कांहीं नजरेनं पाहिलं कीं, माझा चेहरा लाजेनं लाल झाला.

"मामलेदारसाहेबांना कां सांगत नाहींस? ते कसं झालं तरी तुझे वडील आहेत."

"अब्बांना सांगितलं तर ती हडळ मला जिवंत ठेवणार नाहीं. आणि अब्बा तरी माझी तक्रार कशाला मनावर घेतील? तूं पाहिलं नाहींस का, त्यांच्यासमोर ती किती गोड गोड गोष्टी बोलते?"

"मग?" या वेळीं मीच हा प्रश्न केला.

माझ्या नजरेला नजर भिडवून ती म्हणाली, "चल, ममदू. कुठं तरी पळून जाऊं. माझ्यापाशीं थोडेसे दागदागिने आहेत. तीस-चाळीस रुपयेहि मीं जमविलेले माझ्यापाशीं आहेत."

श्रीमंत पोरी आपल्या नोकरांबरोबर पळून जातात अशा गोष्टी मीं ऐकल्या होत्या खऱ्या. परंतु मी समजत होतों, कीं या गोष्टी नुसत्या कथा-कहाण्यांतच असतात. पण बानोच्या तोंडानं स्वतःच तें ऐकल्यावर मात्र माझी परिस्थिति खरोखरच अशी झाली सरकार, कीं मी अगदीं स्तंभित झालों! डोक्यापासून पायापर्यंत थरथर कंप सुटला. कांहीं उत्तरच देतां येईना. हृदयाचे दोन तुकडे झाले आहेत असं वाटूं लागलं. एक हृदय म्हणत होतं—"अरे ममदू, तुझं नशीब उघडलं आहे. अशा मोका पुन्हां मिळणार नाहीं. जरा मुलीचं यौवन तर पाहा. आणि तुझी आई जिच्याशीं तुझ्या नशिबाची गांठ बांधणार आहे त्या विणकऱ्याच्या काळ्याकुळकुळीत पोरीशीं तुलना तर करून पाहा. आणि शिवाय तीच सांगत आहे कीं दागदागिने आहेत. बस, आतां चैन करायची, चैन!" पण सरकार, दुसऱ्या हृदयानं सांगितलं, "आपली कुवत विसरूं नकोस. तूं ममदू आहेस, ममदू-बुंदू जुलाह्याचा पोरगा. इतके जोडे खावे लागतील तुला कीं तुझ्या डोक्यावर एक केंसहि शिल्लक राहणार नाहीं!"

ही गोष्ट बरी झाली सरकार, कीं तेवढ्यांत शाळेचा एक मास्तर समोरून येतांना दिसला आणि बानोनं लगेच बुरखा घेतला. मग हळूच ती मला म्हणाली—"चार वाजतां सुट्टी होईल. पण तीन वाजतां टांगा घेऊन ये. साडेतीन वाजतां कलकत्ता मेल निघते. बस. आज मी घरीं जाणार नाहीं."

मास्तर जवळून पुढें निघून गेल्यावर मी हळूच








म्हणालों, "बीबी, असं बोलूं नका. मामलेदार-साहेबांना समजलं तर माझी चामडी लोळवतील." ती म्हणाली, "अरे, तूं मर्द असून असा घाबरतोस?" आणि नंतर बुरख्यांतून एक लहानसा आवाज आला : "भमदू, तूं तीन वाजतां टांगा घेऊन आला नाहींस तर माझ्या बऱ्या वाइटाची जबाबदारी तुझ्या डोक्यावर !"

बस, एवढं म्हणाली आणि ती झटकन् शाळेंत निघून गेली आणि मी मात्र त्या दरवाज्यासमोर तसाच उभा राहिलों. माझ्यावर मोठी आपत्ति कोसळली आहे असं वाटलं. आपणच सांगा सरकार, करावं तरी काय अशा वेळीं ? एका बाजूला मामलेदार-साहेबांच्या चाबकाचा धाक, दुसऱ्या बाजूला बानोच्या जीवाचा प्रश्न. कुणास ठाऊक, मी किती वेळ त्या शाळेच्या दरवाजासमोर उभा राहिलों. तेथून परत निघालों तो सरळ पायवाटेनं न जातां किती तरी वेळ शेतांत भटकलों. जेव्हां मी बंगल्यावर परत आलों तेव्हां बारा वाजले होते आणि खानम कोधानं जोरांत तडफडत होती. मी दरवाजांत पाऊल टाकलं तोंच शिव्याशापांचा वर्षाव सुरू झाला. "आतांपर्यंत कुठं होतास, हरामजाद्या ? घरचं काम तसंच पडलं आहे आणि तूं उडाणटप्पू कुठं तरी भटकत फिरतोस ! कां, आतां बोलत कां नाहींस ! होतास तरी कुठं ?" आणि जेव्हां माझ्या तोंडून एकहि शब्द बाहेर पडला नाहीं तेव्हां ती डोळ्यांनीं आग पाखडीत माझ्यापाशीं आली. "अरे बोलत कां नाहींस ? मुकाभिका झालास कीं काय ?" असं म्हणून माझा हात पकडून तिनं मला गदगदां हलविलं. पण जसा तिनं माझ्या हाताला स्पर्श केला तशी ती ओरडली, "अरे, तुला तर ताप चढलाय्. प्लेग तर नाहीं ? घरांत एक मेलेला उंदीर सांपडला आहे." आणि तिनं अशा तऱ्हेनं माझ्याकडे पाहिलं कीं, जणूं कांहीं मीच तो मेलेला उंदीर होतों. आणि माझ्या स्पर्शानं कांहीं रोग होईल कीं काय म्हणून लगेच ती कॅरबॉलिक साबणानं हात धुऊं लागली.

सरकार, खुदा जें कांहीं करतो तें चांगल्या-करतांच करतो. मला प्लेग झाला नाहीं. पण त्या दिवसापासून जो मलेरिया सुरू झाला त्यानं एक महिन्यापर्यंत माझी पाठ सोडली नाहीं. मी अर्धमेला झालों. पण मामलेदारसाहेबांच्या चाबकापासून तर बचावलों ! खानमनं तर त्याचदिवशीं मला चपराशा-बरोबर घरीं पाठविलं आणि सांगितलं कीं, "बस, आतां इकडे परत यायची कांहीं जरुरी नाहीं. अशा दररोज आजारी पडणाऱ्या नोकराची आम्हांला जरुरी नाहीं." घरीं पोंचलों नाहीं तोंच थंडीतापानं गांठलं. आणि अशी थंडी वाजायला लागली कीं आईनं घरांतल्या रजया, कांबळीं, घोंगड्या माझ्या अंगावर घातल्या, तरीहि कांपरं कमी झालं नाहीं. पण तशा तापांतहि, सरकार, बानोची आठवण माझ्या हृदयांतून दूर झाली नाहीं. आणि बेशुद्धींतहि सारखं सारखं हेंच ओरडत होतों, "छोटी बीबी, तुम्ही घाबरूं नका. मी बरोबर तीन वाजतां टांगा घेऊन येतों." एवढं झालं कीं शेवटीं माझ्या बापानं कटाळून मला विचारलं, "अरे, 'टांगा, टांगा' म्हणून काय सारखा उगीच बडबडतोस ? काय तुझ्या डोक्यालाहि ताप चढलाय् काय ?"

महिन्याभरानं जेव्हां चालण्याफिरण्याइतपत बरा झालों, तेव्हां समजलं कीं, कुद्रतुल्ला खां मामलेदार-साहेबांची बदली सहाराणपुरला झाली आहे, त्यांच्या जागीं कोणी दुसराच मामलेदार आला आहे. आणि हेंहि समजलं कीं खांसाहेबांना बढती मिळाली आहे आणि आतां ते डेप्युटी कलेक्टर झाले आहेत. डेप्युटी कलेक्टर तर फार मोठा अधिकारी असतो सरकार, आणि त्याचा पगारहि मोठा असतो. म्हणूनच तर खां-साहेबांनीं सहाराणपुरला जातांच मोटारसुद्धां घेतली, ड्रायव्हरहि ठेवला. आतां तुम्ही विचाराल कीं, 'अरे तुला कसा पत्ता लागला कीं त्यांनीं मोटार घेतली आणि ड्रायव्हर ठेवला ?' तर सरकार, त्याची हकीगत अशी कीं, बरा झाल्यावर दोन-चार महिन्यांनीं मी लाला गिरिधारीमल आडत्याच्या धान्याच्या दुकाना-वर धान्याचीं पोतीं वाहण्याच्या कामावर होतों. एके दिवशीं मीं पाहिलं, कीं कोणी सहाराणपूरचे जमिनदार ठाकुर नवाबअली आले होते. ते सांगायला लागले, "लाला, ऐकलं का ? ते तुमच्या इथं कुद्रतुल्ला खां मामलेदारसाहेब होते ना—" हें नांव ऐकतांच मी सावध झालों आणि पोत्यांच्या पाठीमागून नीट कान देऊन ऐकूं लागलों.







लाला म्हणाला, " हं, हं, ते तर आतां तुमच्याकडे डेप्युटी कलेक्टर झाले आहेत आणि आतां तर म्हणे ते फार रुबाबांत असतात. मोटारहि घेतली आहे त्यांनीं. "

ठाकूर नवाबअली म्हणाले, " अरे लाला, हा मोटारीचा तर प्रसाद आहे. मोटारीचा आणि नवीन शिक्षणाचा ! "

माझ्या कांहींच लक्षांत आलं नाहीं. लालाहि म्हणाला, " ठाकूरसाहेब, काय म्हणतांयू तरी काय ? "

ठाकूरसाहेब म्हणाले, " लाला, मला एवढंच सांगायचंय कीं, मामलेदार कुद्रतुल्ला खांसाहेबांची पोरगी त्यांच्या ड्रायव्हरबरोबर पळून गेली ! "

मी माझ्या हृदयाला लाख वेळां समजावलं कीं, ' अरे, तुला तर आनंद वाटला पाहिजे. आतां खांसाहेबांचा चाबूक त्या साल्या ड्रायव्हरच्या पाठीवर पडेल ! तूं तर साफ वांचलास.' पण खोटं कशाला बोलूं, सरकार. खरी गोष्ट ही आहे सरकार, कीं दिवसभर मला काम सुचलं नाहीं आणि त्या रात्रीं जेव्हां आईनं नेहमींप्रमाणें बुंदी जुलाह्याच्या शिरींबरोबर माझं लग्न लावण्याचा प्रश्न काढला, तेव्हां मीहि सांगून टाकलं, " ठीक आहे, जशी तुझी इच्छा ! "

संतोष ही अजब चीज आहे, सरकार. माणूस आपल्या नशिबावर विश्वास ठेवून कृतज्ञता बाळगूं लागला, म्हणजे मग हेच फूटपाथचे दगडसुद्धां मखमाली गादी बनतात आणि रात्रींच्या अंधारांत काळी शिरी विणकरीणसुद्धां बानोसारखी सुंदर दिसूं लागते. वर्षहि झालं नाहीं तोंच शिरीनं एका मुलाला जन्म दिला. पुढच्या वर्षीं एक मुलगी. नंतर तर सरकार नंबरच लागले. सहा वर्षांत पुरेपूर पांच पोरं—तीन पोरी, दोन पोरं. पण खुदाच्या इच्छेपुढं कुणाचं कांहीं चालतंय थोडंच ? मुलं हीसुद्धां त्याचीच देणगी आहे. जेव्हां पाहिजे तेव्हां परत न्यावीं. एक मुलगा तर जन्मल्यावर लगेच वारला आणि एक पोरगी दोन वर्षांची झाल्यावर न्युमोनिया होऊन वारली. आतां एक पोरगा आणि दोन पोरी राहिल्या आहेत. पण मला एवढ्या पोरांचाहि सांभाळ करणं कठिण गेलं. घरचा सारा भार तर आतां माझ्यावरच होता. बाबा अंथरुणाला खिळला होता. आणि अम्माला कमी दिसायला लागलं होतं. बिचारी दिवसांसुद्धां चांचपडत असायची. माझा थोरला भाऊ जो दहा वर्षांपूर्वीं मुंबईला गेला तो गेलाच. ना कांहीं चिठ्ठी, ना रुपये. पहिल्यांदा समजलं कीं कोणत्या तरी कापडाच्या कारखान्यांत काम करीत आहे. नंतर ऐकलं, कीं एका फिल्म कंपनींत चौकीदार आहे; मोठमोठ्या सुंदर नटींच्या मोटारींचे दरवाजे उघडतो ! मलाहि कधीं कधीं वाटायचं कीं जावं भावाकडे, जरा मुंबई-कलकत्त्याची सफर करावी. पण घरच्या मंडळींना कसं सोडणार ? आणि शिवाय रेल्वेचं भाडं कुठून आणूं ? तेव्हां याच विचारांत कित्येक वर्षें गेलीं आणि आम्ही मुजफरनगरांतच मेहेनतमजुरीवर संतोषानं राहिलों.

पुढं ईश्वराची करणी अशी कीं मलाहि कलकत्त्याला जायची संधि मिळाली. त्याचं असं झालं : आमच्या मोहल्ल्यांत एक लहान बेकरीवाला राहत होता. त्याचा पोरगा रहमत काम हुडकण्यासाठीं एक वर्ष झालं तिकडे गेला होता. तो जो परत आला तो काय सांगावं. अगदीं जन्टलमन बनला होता. जपानी सिल्कचा सदरा, गळ्याला सोन्याचीं बटणं, केंस इंग्रजी पद्धतीनं कापलेले. तो माझा लहानपणचा दोस्त होता. मी म्हणालों, " काय बे रहमत, कुठलं पुरलेलं डबोलं सांपडलं रे तुला ! " तो म्हणाला, " आम्ही तर पाण्याचं सोनं करतों. " मला वाटलं, कीं साल्याला किमया करण्याची युक्ति सांपडली असेल. पण त्यानं सांगितलं कीं, रेल्वेंत सोडा-लेमन विकायचा मक्ता घेतलाय, त्यांत महिन्याला दोनअडीचशें रुपयांची मिळकत होते. सांगायला लागला. " प्रत्येक स्टेशनावर जे 'सोडा-लेमन-बरफ' ओरडतात त्या नोकरांना तर मी महिन्याला तीस रुपये देतों आणि साले मुंबई-कलकत्त्याची फुकटांत वारी करतात ती निराळीच ! " हें ऐकून माझ्या तोंडाला पाणी सुटलं. मी म्हणालों, " रहमतभाई, कलकत्ता एकदां आम्हांला दाखव कीं ! "

तर सरकार सोडालेमन विकत विकत मीहि कलकत्त्याला पोंचलों. मीं पहिल्यांदा दिल्लीहि पाहिली नव्हती. कलकत्ता पाहून तर आश्चर्यचकित झालों. इतक्या मोठ्या साफ सडका, त्या मोटारी,










बस, ट्रामगाड्या मीं कुठं पाहिल्या होत्या ? मीं विचार केला, रहमतच्या सोडालेमनला जाऊं द्या खड्ड्यांत. आपण आपलं इथंच राहावं. तो दिवस आणि आजचा हा दिवस—पंधरा वर्षं झालीं. आजपर्यंत कलकत्याच्या बाहेर पाऊलहि टाकलं नाहीं.

पहिले कांहीं महिने तर मी रिक्षा चालवीत होतों. दिवसांत कधीं कधीं दोनअडीच रुपयेसुद्धां मिळायचे. मीं विचार केला, हें काम फार चांगलं आहे, महिन्यांत साठ-सत्तर रुपयांची कमाई होते. मजुरांच्या वस्तींत एक खोली घेतली होती. तिचं भाडं दहा रुपये देत होतों. कधीं कधीं दहा-पंधरा रुपये बायकोला पाठवीत होतों. पण हें खरं कीं, दुसऱ्या वर्षानंतर मात्र मी कांहीं पाठविलं नाहीं. तिची काय अवस्था झाली असेल याचाहि पत्ता नाहीं. तरुण होतों, सरकार ! आणि शिवाय कलकत्यांत जर रुपया दोन रुपयांत सोनागाचींत नवीन बीबी मिळते, तर मग शेंकडों मैल दूर राहणाऱ्या कुरूप बीबीला रुपये पाठविणें कठिण वाटणारच कीं ! शिवाय दारू पिण्याची संवयहि लागली होती. सरकार, आपण म्हणाल कीं हा माणूस उडाणटप्पू, बदमाष आहे. पण खरं म्हणजे, दिवसभर गाढवाप्रमाणं रिक्षा ओढल्यानंतर दुःख कमी करण्यासाठीं सायंकाळीं थोडी दारू पाहिजेच आणि नंतर दारू झोंकल्यावर आपोआप सोनागाचीकडे कशीं पावलं वळायचीं तें समजतहि नसे.

हो, तर वर्षभर रिक्षा चालवली. शें-सव्वाशें रुपये अडीअडचणीच्या वेळीं उपयोगी पडावेत म्हणून शिल्लक टाकले. पण ती अडीअडचणीची वेळ लगेच येणार आहे हें मात्र मला समजलं नाहीं. पावसाळ्यांत भिजून ताप चढला, तापांतून न्यूमोनिया झाला. डॉक्टर म्हणाले, " रिक्षा ओढून ओढून फुप्फुसं कमजोर झालीं आहेत. हें काम सोडून दे. " पुरा दीड महिना पडून राहिलों. जेव्हां तापानं पिच्छा सोडला, तेव्हां रिक्षा चालवण्याची अंगांत ताकदच राहिली नव्हती. जो कांहीं जमविलेला पैसाअडका होता तो सर्व संपला होता. तरी देवाचे आभार मानले कीं न्युमोनियानं निदान मेलों तरी नाहीं. विचार केला, " जिवंत तर आहे. रिक्षा जाऊं द्या खड्ड्यांत. दुसरं कांहीं तरी काम करूं. कलकत्ता शहरांत खुदा तीस लाख लोकांना मजुरी देतो ! मग तो मलाच देणार नाहीं कीं काय ? " ईश्वरावर भरंवसा ठेवून बसलों.

माझ्या शेजारपाजाऱ्यांच्या खोल्यांतून माझ्यासारखेच कांहीं मजूर राहात होते. त्यांतला एक होता हरनाम, बुलंद शहरचा ठाकूर. पण बापानं सगळी संपत्ति दारू पिऊन उडविली होती. पोराला लिहावाचायला शिकविलं नव्हतं, म्हणून आतां कारखान्यांत मजुरी करीत होता. बनारसचा एक चांभार होता, मंगू. पिलीभीतचा एक मुसलमान होता, रहिमतखान. आणि मजा ही कीं तिघांत गाढ दोस्ती होती आणि ते एकत्रच राहात होते. मी एकदां रहमतखांला एकटाच असतांना म्हणालों, " तूं या काफीरांच्या बरोबर राहतोस, तुला कांहीं इमानधर्म आहे कीं नाहीं ? " तो शिवी देऊन म्हणाला, " अरे, इमानधर्मकी ऐसी की तैसी. आमचा धर्म तर मजुरी आहे, मजुरी ! "

हे तिघेजण मला म्हणाले, " चल, तुला आमच्या कारखान्यांत नोकरीस लावतों. दोन रुपये रोज मजुरी मिळेल. " मीं विचार केला, " चला, बरंच आहे. रिक्षा ओढून ओढून फुप्फुसं पोकळ करण्यापेक्षां कारखान्यांतील मजुरी चांगली. " दुसऱ्या दिवशीं ते मला आपल्याबरोबर कारखान्यांत घेऊन गेले. ताग विणायचा कारखाना होता तो आणि तिथं ज्याला सर्वजण सरदार, सरदार म्हणत होते त्या मजुरांच्या मक्तेदाराला माझ्यातर्फें पांच रुपये लांचहि देण्यांत आली. पण मला नोकरी मिळाली नाहीं. वीव्हिंग मास्तर म्हणाला, " आजकाल काम कमी आहे म्हणून आम्हीच पुष्कळ मजुरांना कमी करण्याच्या विचारात आहोंत. नवीन इसम कुठला घेणार ! " आणि माझ्याकडे बोट करून तो म्हणाला, " शिवाय आमच्या कामाचा याला अनुभव नाहीं. कित्येक दिवस तर काम शिकायलाच लागतील. "

मी परत आलों आणि पुन्हां रिक्षावाल्या मालकाकडे जाण्याचा विचार करूं लागलों. पण ईश्वराची कृपा अशी, कीं त्याच महिन्यांत त्या कारखान्यांत संप सुरू झाला. त्याचं असं झालं : मालक म्हणाले, " बाजारांत मंदी झाल्यामुळं एक तर








पुष्कळ मजुरांना कमी करावं लागेल, नाहीं तर त्यांचा पगार तरी कमी करावा लागेल. म्हणून आम्ही दोन रुपयांच्या ऐवजीं दीड रुपया मजुरी देण्याचा निर्णय घेतला आहे." मजुरांनीं हा निर्णय ऐकल्यावर त्यांच्यांत एकच खळबळ उडाली. संपाची तयारी सुरू झाली. मी, रहमतखान आणि मंगू यां दोघांनाहि संपाबद्दल बोलतांना ऐकलं व म्हणालों, "तुम्ही लोक वेडे झालां आहांत कीं काय? आठ आण्यांच्या लोभानं दीड रुपया रोजच्या कमाईवर लाथ मारतां आहांत? अरे भाई, जें मिळत आहे त्यांतच संतोष मानावा. खुदाची मर्जी झाली तर मजुरी पुन्हां वाढेल." पण त्या दोघांच्या डोक्यांत संपाचं भूत नाचत होतं. रहमतखान म्हणाला, "या वेळीं गप्प बसून आम्ही पगारांतली कपात मानली तर उद्यां हे मालक आमच्या डोक्यावर बसतील, डोक्यावर!" आणि मंगू एक मोठी शिवी हांसडून म्हणाला, "जर बाजारांत मंदी व्हायला लागली आहे, तर हे साले मालक आपल्या पांच मोटारींतल्या दोन-चार विकून कां टाकीत नाहींत? साल्यानं तीन तीन बायका केल्या आहेत. त्यांतली एक विलायती मडुमसुद्धां आहे!"

हो, तर जेव्हां युनियनवाल्यांनीं संपाची घोषणा केली तेव्हां या दोघांनीं कामावर जाण्याचं बंद केलं. पण हरनाम सकाळीं उठून गुपचूप कामावर गेला. हरनाम कामावर गेला आहे ही बातमी वस्तींत लगेच पसरली. त्याच्याशिवाय संपांत सामील न झालेले असे पन्नास-साठ मजूर होते. पण रहमत आणि मंगू यांना हरनाम गेल्यामुळं फार वाईट वाटलं. रहमत तर म्हणाला, "नाहीं, नाहीं. हरनाम आमच्याविरुद्ध जाईल असं होणारच नाहीं. तो सहज फिरायला गेला असेल." पण संध्याकाळीं हरनाम जेव्हां परतला तेव्हां त्याच्या कपड्यांवर पडलेल्या काळ्या डागांमुळं तो कामावरूनच परतला आहे, हें समजत होतं. मंगू तर त्याला आई-बहिणी-वरून शिव्या देऊं लागला. पण रहमतनं विचारलं, "काय हरनाम, हें खरं का?" हें ऐकून हरनाम ओरडून म्हणाला, "होय, होय. कामावर गेलों होतों. कुणाला काय करायचं असेल तें करा." रहमत अजूनहि हळूहळू म्हणाला, "बराय्, असंं आहे काय?" मग तो उठून खोलींत गेला आणि परतला, तेव्हां त्याच्या हातांत हरनामचा बिस्तरा, पत्र्याची ट्रंक आणि दुसरं सामान होतं. मोठ्या शांततेनं त्यानं तें सर्व सामान सज्ज्याच्या बाहेर मैदानांत फेंकून दिलं. जास्ती कांहीं एक शब्दहि तो बोलला नाहीं गुपचूप जाऊन तो आपल्या खाटेवर पसरला आणि हुक्का ओढूं लागला. हरनामचे डोळे रागानं लाल झाले. बाह्या चढवून रहमतकडे तो निघाला. पण मंगू मधें आला. काळाकुट्ट मंगू होता काटकुळा-हडकुळाच. पण त्याच्या हातांत फार ताकद होती आणि होताहि मोठा चपळ. हरनामला थोपवून त्यानं जी एक टांग मारली त्यासरशीं तो चारी मुंड्या चीत होऊन जमिनीवर कोसळला. तेवढ्यांत वस्तींतले सगळे मजूर जमले होते. हरनामवर सर्वजण चिडलेले होते. त्याला पडलेला पाहून सर्वजण खदखदून हंसायला लागले. आणि जेव्हां तो आपला श्वास सांवरीत उठला तेव्हां चारी बाजूंनीं आपण घेरले गेल्याचं त्याच्या लक्षांत आलं. तो रहमतवर अगर मंगूवर चालून जाता तर, त्याच्यावर सर्वजण तुटून पडले असते. म्हणून त्या बिचाऱ्यानं आपल्या सर्व वस्तू गोळा करून माझ्या खोलीच्या समोर सज्ज्यांत ठेवल्या आणि मला म्हणाला, "ममदू, मी तुझ्याकडे येऊं का? आजपासून खोलीचं सर्व भाडं मीच देत जाईन."

सरकार, आंधळ्याला काय पाहिजे, दोन डोळे! मी तर बेकार. प्रत्येक महिन्याचं भाडं कसं द्यायचं याची चिंता मला पहिल्यापासूनच लागली होती. म्हणून मी म्हणालों, "तूं कांहीं काळजी करूं नकोस, हरनाम. मी कुणालाहि घाबरत नाहीं." आणि म्हणतात ना कीं 'दुसऱ्याचं करावं भलं म्हणजे आपलंहि होतं चांगलं!' तसंच झालं. मीं हरनामला राहायला माझ्या खोलींत जागा दिली आणि त्यानं दुसऱ्या दिवशींच मला कारखान्यांत नोकरी मिळवून दिली. संपामुळं मालक कोणालाहि ठेवायला तयार होते. मग त्याला काम येत असो अगर नसो! बस, दोन हात आणि दोन पाय मात्र पाहिजेत. मलासुद्धां दीड रुपया रोजावर नोकरी मिळाली. स्ट्राइकअलावन्सचा एक रुपया जास्त मिळत होता आणि मिळायलाच








# अल्लाची मेहेरबानी !

"तुला खुदानं दिली आहे." बस. एवढं म्हणाला आणि तेथून निघून गेला. पण हें ऐकून मला जराहि राग आला नाहीं. फक्त मीं विचार केला, "किती कमनशिबी आहे हा रहमत ! याला संतोषाची किंमत माहीत नाहीं ! आणि कुणास ठाऊक, कदाचित् खुदा संप फोडणाऱ्यांवरच खूष असेल आणि म्हणूनच एवढ्या मोठ्या दुर्घटनेनंतरहि माझा जीव वांचला. नाहीं तर सर्व संप फोडणारांचे पाय तुटावयास पाहिजे होते."

सरकार, संतोषाच्या परीक्षेस मी पुरेपूर उतरलों. जेव्हां रबरी अगर लांकडी तंगडी मिळाली नाहीं तेव्हां मीं संतोषाची तंगडी लावून टाकली आणि जुन्यापान्या वस्तू विकणाऱ्या दुकानदाराकडून या दोन कुबड्या घेतल्या आणि त्या दिवसापासून यांच्याच आधारावर लंगडत, उडया मारीत चालतों. जेव्हां मेहनत-मजुरी मिळाली नाहीं तेव्हां भीक मागायला सुरुवात केली. जेवण देणारा तर खुदाच आहे, माणूस तर त्याचा बंदा आहे. मग कोणाच्याहि समोर हात पसरायला लाज कसली? खरं म्हटलं, तर आम्ही खुदाच्या समोरच हात पसरत असतों ! आपण हें ऐकून चकित व्हाल सरकार, कीं मी भीक मागून दररोज दीडदोन रुपयांहून जास्तीच मिळवतों. मग कारखान्याची पर्वा कशाला? आणि हो, जेव्हां हरनाम लग्न करून बायको घेऊन आला आणि जेव्हां त्यानं माझ्या खोलींतून मला बाहेर काढलं, तेव्हांपासून या सडकेच्या फळीलाच मीं घर मानलं. छत आणि बिछायत, बंगले आणि खोल्या, पलंग नि खुर्च्या हे सर्व तर रिकामे चोचले आहेत ! संतोषाचं छत आणि संतोषाची बिछायत असली, कीं सडकेच्या कडेचंहि महालांत रूपान्तर होतं.

कित्येक महिने मीं संतोषानं भीक मागत घालविले. मला या भिकाऱ्याच्या जीवनांत आनंद वाटूं लागला. घरादाराचा व्याप नाहीं, मेहनत नाहीं, मजुरी नाहीं, घरमालकाला भाडं द्यायला नको कीं शेजार-पाजारचीं भांडणं नकोत. भिकाऱ्याचं जीवनच सर्वांत खरोखरी स्वतंत्र जीवन असतं. मी दुसरीं सर्व बंधनं, गरजा, भांडणं यांच्यापासून मुक्त झालों होतों. पण पाय तुटला होता तरीहि एक ...

अजूनहि थंडीच्या रात्रीं मला त्रास देत होती. जेव्हां माझ्यापाशीं पांच-सहा रुपये जमत तेव्हां मी गुपचूप सोनागाचींत जात असे. आपल्याला माहीत असेल, सरकार, कीं या बाजारांत श्रीमंत-गरीब, नवाब-फकीर सर्व सारखेच असतात. ज्याच्या खिशांत पैसा असेल तो पाहिजे तो माल खरेदी करूं शकतो, मग तो लंगडा, लुळा भिकारी का असेना !

थंडीच्या रात्रीची गोष्ट आहे. मी कुबडीच्या साहाय्यानं सोनागाचींत एका खोलीच्या पायऱ्या चढलों. ही जागा मला नवीन नव्हती, मी नेहमीच इथं येत असे. दोन रुपयांत सौदा होत असे. पण त्या रात्रीं म्हातारी मला पाहातांच हंसून म्हणाली, "काय रे लंगड्या, पुन्हां आलास काय तूं? पण आज दोन रुपयानं भागणार नाहीं. गोधडींत पांच रुपये असतील तर ठीक नाहीं तर रस्ता सुधार !"

त्या दिवसांत मला भीक चांगली मिळत गेली होती. चाळिसाच्या नोटा तर मीं गोधडीच्या आंत शिवून टाकल्या होत्या आणि सात-आठ रुपये या वेळीं माझ्यापाशीं होते. मी म्हणालों— "मी लंगडा असलों म्हणून काय झालं? माझा पैसा तर दो पायांवर चालतोय ना. माल दाखव. पांच रुप सुद्धां देईन."

पण ती म्हातारी होती मोठी धूर्त. पोर तर तिनं दाखविली नाहींच. पण माझ्याकडून रुपये अगोदर घेतले आणि मग मला आंत खोलींत ढकललें.

आंत जाऊन मी कुबड्या फेंकून दिल्या पलंगावर बसलों. पोरगी खरंच नवीन दिस ती डोकं खालीं करून बसली होती.

मी म्हणालों, "मेरी जान, जरा पाहूं दे. मी लंगडा आहे, पण तुला खूष क

तिनं घुंघट बाजूस सारला नि विश्वा सरकार, माझ्या पायाखालची जमीन नाहीं

ती ओरडली, "ममदू !"

आणि मी ओरडलों, "छोटी बीबी, इथं?"

ती म्हणाली, "होय, ममदू, हा न नशिबाचा फेरा आहे. तुझ्या पायाला काय झालं








मी म्हणालों, “ हा माझ्या नशिबाचा फेरा आहे. ”

ती रडत होती. मीं समजावण्याचा प्रयत्न केला, तर बानो मला मिठी मारून मुसमुसूं लागली. मी नीट पाहिलं. तीन वर्षांत तिचं पूर्वीचं रूप राहिलं नव्हतं. वीस-एकवीस वर्षांची असूनहि तीस-पस्तीस वर्षांची वाटत होती ती. डोळे खोल गेलेले; पावडर; तांबडा रंग लावलेला असूनहि रंग पिवळा. दुबळी तर इतकी झाली होती, कीं हातांची हाडंच्या हाडंच राहिलीं होतीं. आणि हो, तोंडावर कांहीं कांहीं ठिकाणीं चमत्कारिक फोड आले होते!

जेव्हां कांहीं वेळानंतर अश्रू थांबले तेव्हां तिनं मला तिची हकीगत सांगितली. ज्या ड्रायव्हरबरोबर ती पळून गेली होती तो मोठा बदमाश निघाला. कलकत्त्याला नेऊन दोनतीन महिने त्यानं बानोचे दागदागिने विकून मजा केली. मग जेव्हां गरज भागेना तेव्हां त्यानं तिला कुकर्म करण्यास भाग पाडलं आणि एका रात्रीं एका शेठजीला विकून तो पसार झाला.

मी म्हणालों, “ पण, छोटी बीबी, तुम्ही पोलीसला रिपोर्ट कां दिला नाहीं? तुम्ही तर कल्यासवरलेल्या होतां. मामलेदारसाहेबांना लिहिलं असतं, तर ते स्वतः येऊन तुम्हांला घेऊन गेले असते आणि त्या ड्रायव्हरची त्यांनीं चामडी काढिली असती! ”

ती म्हणाली, “ पोलिसला रिपोर्ट दिला असतां त्यांनी जबरदस्तीनं घरीं परत पाठविलं असतं! ... काय होणार? पण माझ्यावर जीं संकटं ... यानंतर मी अब्बांच्या समोर तरी कोणत्या ... जाणार? ”

... काय, कीं बिचारी बानो एका हातांतून ... हातीं जात जात या वाईट वेश्याघरांत ... होती. त्या ठिकाणीं नशीब त्या रात्रीं मला ... लं होतं. मी म्हणालों, “ आतां तूं कांहीं ... करूं नकोस. जोंपर्यंत ममदूच्या जिवांत जीव ... तोंपर्यंत मी तुला कांहींच त्रास होऊं देणार ... . आतां मी तुला या पापी नरकांत एक मिनिटहि ... देणार नाहीं. ”

ती नजर खालीं करून म्हणाली, “ पण ममदू, मी आजारी आहें. फार वाईट रोग आहे. ”

बानोच्या चंद्रासारख्या चेहऱ्यावर डाग दिल्याप्रमाणें दिसणाऱ्या त्या फोडाचं आतां मला कारण समजलं. पण मी म्हणालों, “ कांहीं हरकत नाहीं. मीहि कुठं मोठा देखणा तरुण आहे? लंगडा भिकारी तर आहे! मी तुला औषधोपचार करीन. तूं खात्रीनं बरी होशील. मी ऐकलं आहे, कीं आतां प्रत्येक रोगावर उपाय निघाला आहे. चल माझ्याबरोबर, या घटकेला. ”

आम्ही एवढं बोलत होतों तोंच दरवाजा खट्-खट् वाजला. मी म्हणालों, “ आंत या. ” म्हातारी म्हणाली, “ अरे ए लंगड्या! पांच रुपये दिले आहेस म्हणून कांहीं तुला सबंध रात्रीचा मक्ता दिला नाहीं. दुसरं गिऱ्हाईक वाट पाहतंय. ” पाठीमागं एक भयानक, काळा, मोठा तगडा माणूस नशेंत डोलत होता. मी एका हातानं बानोचा हात पकडत आणि दुसऱ्या हातानं कुबड्या सांवरत म्हणालों, “ ही मुलगी माझ्याबरोबर येणार आहे. आतां इथं राहणार नाहीं. ”

त्यानंतर नक्की काय झालें त्याचें मला स्मरण नाहीं. बहुतेक त्या म्हातारीनं त्या इसमाला इशारा केला. तो बानोला पकडण्यासाठीं पुढं झाला. बानोची ती दगडालाहि पाझर फोडणारी किंकाळी मात्र आठवते. कशी कुणास ठाऊक, माझी कुबडी वर उचलली गेली आणि त्या दारुड्याच्या टाळक्यावर आदळली गेली. दुसऱ्या क्षणीं तो जमिनीवर बेहोष होऊन पडला होता आणि त्याच्या डोक्यांतून रक्त वाहत होतें. व म्हातारी ओरडत होती, “ खून! खून! धांवा! धांवा! या खुनी माणसाला पकडा! ” आणि बानो घाबरलेल्या नजरेनं माझ्याकडे पाहात होती आणि म्हणत होती, “ ममदू, हें तूं काय केलंस? ” आणि मी म्हणत होतों, “ छोटी बीबी, तुम्ही चिंता करूं नका. त्या दिवशीं मी वेळेवर टांगा घेऊन आलों नव्हतों ना, त्याची ही शिक्षा आहे. ”

आणि मग, तो दिवस आणि आजचा हा दिवस. दहा वर्षे कैद भोगली. परवांच सुटलों. एक रुपयां तोच सडकेचा किनारा आहे, तीच










## अल्लाची मेहेरबानी !

संतोषाची बिछायत आणि संतोषाचं छत. ऐकतोंय कीं या दहा वर्षांत म्हणे एक मोठी लढाई होऊन गेली. झाली असेल! ऐकतों कीं लाखों हिंदू-मुसलमान एक दुसऱ्याकडून मारले गेले आणि याच कलकत्याच्या रस्त्यांवर रक्ताचे समुद्र वाहिले होते. वाहिले असतील! हेंहि ऐकतों कीं म्हणे देश स्वतंत्र झाला आहे. झाला असेल! मला तर पत्ता नाहीं. मी तर इतकेंच जाणतों कीं पहिल्यापेक्षां आतां भीक कमी मिळते आणि पुष्कळसे दयाळु लोक जेव्हां माझ्याजवळून जातात आणि पैसा देण्यासाठीं खिशांत हात घालतात, तेव्हां त्यांचे खिसे रिकामेच निघतात!

तरीहि मी खुदाचे आभार मानतों कीं कमींत कमी एक तरी पाय आहे! रुल्दूसारखा अजिबात पांगळा तर नाहीं! आभार मानतों, कीं रोज रुपया नाहीं तरी निदान चार-पांच आणे तरी मिळतातच. आणि कृतज्ञता व्यक्त करतों, कीं बानो अजूनपर्यंत जिवंत आहे आणि माझ्यापाशीं आहे. ती तुम्हांला समोर म्हातारी दिसतेय् ना? ती आपल्या पांढऱ्या केंसांतून उवा काढून मारतेय, ती बानो आहे, बानो! जिचा कधींकाळीं मैदा आणि मधाप्रमाणं रंग होता आणि एकेकाळीं आपल्या बुरख्यांतून चेहरा बाहेर काढून माझ्याकडे पाहून जी स्मित करायची तेव्हां वाटायचं कीं ढगांतून चंद्र बाहेर पडला आहे व जिचे डोळे कटोऱ्यासारखे मोठे होते आणि जिच्या केंसांचा मंद मधुर सुवास धुंद करण्यास पुरेसा होता! आतां तिच्या चेहऱ्यावर सुरकुत्या पडल्या आहेत आणि सारा चेहरा फोड-फुटकुळयांतून वाहणाऱ्या पुवानं भरून गेला आहे. कित्येक दिवस झाले, तिचं डोकं काम देईनासं झालं आहे. आतां तिला लहानपणांतील सुख आठवत नाहीं कीं तरुणपणांतील दुःख आठवत नाहीं. मामलेदारसाहेब, खानम, ममदू, कोणी कोणी आठवत नाहींत! दिवसभर बसल्या-बसल्या उवा मारीत असते आणि आपल्याशींच, कुणास ठाऊक काय, सारखी बडबड असते!...

पण अल्लाची मेहेरबानी आहे. बानो जिवंत आहे आणि माझ्यापाशीं आहे. आणि मी तिला पाहूं शकतों.

---

## जी व न - रा ज !

ये रे! ये प्रिय जीवनराज
कुशल वल्लभापरि मज भुलवित
लेवुनि नित नव साज!

कधिं आशेची फुंकर घालुन
फुलवित ये स्वप्नांचें मधुवन
धुंद सुगंधीं तरंगुं दे मन
विसरुनि शिशिर उदास १

उग्ररोष रुद्रापरि अवचित
स्वप्नभवन ये चुरडित तुडवित
कुतुकभरें तो राहिन पाहत
अद्भुत विकट विलास! २

असाह्य दुर्बल व्यथित कुणी जन
दिसतां, ये हृदिं स्फुरवित कम्पन
नयनांतुनि करिं अमृत-सिंचन
हंसवाया मृत आस ३

होउनि ये कधिं तीव्र व्यथांचा
भुजंग भीषण शत-भोगांचा
सुखशयनीं घुमवीन तयाच्या
अक्षय मुरलि-रवांस ४

मायामय! करिं हृदया अंकित
हर्षित विस्मित दुःखित पुलकित
भावतृप्तिमधिं तुझिया संतत
हो मम गान-विकास ५

—शांता कुळकर्णी








पं. रघुनाथशास्त्री कोकजे

# हिंदु कायद्याच्या मूलभूत सिद्धान्तांचें समीक्षण

स्वतंत्र भारताच्या न्यायालयांत सध्यां जो कायदा रूढ आहे त्याची घडण मुख्यतः ब्रिटिशांच्या राजवटींत झालेली आहे. भारतीय जनता स्वतंत्र होतांच ज्या पुनर्घटनेच्या विविध योजना आपल्या राष्ट्रधुरीणांनीं हातीं घेतल्या त्यांत कायदा-सुधारणेचें नुसतें नांवहि नाहीं. अर्थात् हें विधान इंग्रजींत ज्याला ' पर्सनल लॉ ' असें म्हणतात त्याविषयीं आहे. हिंदु, मुसलमान, पारशी, खिस्ती इत्यादिकांस त्यांच्या त्यांच्या परंपरेप्रमाणें वारसा, विवाह इत्यादीविषयीं जे कायदे लागू करण्यांत येतात त्यांस वैयक्तिक कायदे अथवा पर्सनल् लॉ असें म्हणतात. अहिंदूंच्या अशा वैयक्तिक कायद्यांच्या सुधारणेचा प्रश्न कोणाच्या गांवींहि नाहीं. हिंदु कोड बिल पुढें करून हिंदुसमाजाचा वैयक्तिक कायदा सुधारण्याचा प्रयत्न कांहीं काळ झाला. परंतु पं. जवाहरलाल, डॉ. आंबेडकर अशा अगदीं मोजक्या व्यक्ती वगळल्या तर त्या उपक्रमास कोणत्याहि प्रथितयश व्यक्तीचें पाठबळ मिळालें नाहीं असेंच म्हणावें लागतें. याचें ठळक उदाहरण कॉंग्रेसचेंच देतां येईल. कॉंग्रेसच्या गेल्या वार्षिक अधिवेशनांत हिंदु-कोड या विषयाचें नुसतें नांवहि निघालें नाहीं. यावरून वैयक्तिक कायद्याच्या पुनर्घटनेची कशी उपेक्षा होत आहे हें ध्यानांत येईल. याप्रमाणें या विषयाची उपेक्षा होत असली तरी, त्यास चालना देऊन त्याचें राष्ट्रीय महत्त्व जाणणें हें ज्ञात्यांचें काम आहे. त्यांतील प्रचलित अशा सर्व वैयक्तिक कायद्यांचें नीट समीक्षण करून सर्व भारतीयांसाठीं एकच एक दिवाणी कायदा कसा अस्तित्वांत येईल याचे उपाय शोधून काढले पाहिजेत. त्यासाठीं प्रचलित प्रत्येक वैयक्तिक कायद्याच्या मूलभूत सिद्धान्ताचें परीक्षण होणें अवश्य आहे. हिंदु-कायद्यापुरतें हें कार्य मार्गास लागावें म्हणून या लेखांत हिंदुकायद्याच्या कांहीं मूलभूत सिद्धान्तांचें समीक्षण करण्याचा विचार आहे.

## हिंदुकायद्याचे कित्येक सिद्धान्त

आजचा हिंदुकायदा ब्रिटिशांच्या राजवटींत मुख्यतः घडविला गेला हें वर आलेंच आहे. तो तसा घडवितांना जे मूलभूत सिद्धान्त गृहीत धरले गेले ते पुढील प्रमाणें : १. प्रत्येक हिंदुकुटुंब अविभक्त असतें. २. भाऊ असल्यास बापाच्या संपत्तींत बहिणीस वारसाहक्क नसतो. ३. हिंदु विधवेचें संपत्तीवरील स्वामित्व मर्यादित असतें. ४. हिंदु-लग्न हा संस्कार आहे, करार नाहीं. ५. त्रैवर्णिक स्त्रियांस घटस्फोटाचा अधिकार नाहीं पण शूद्र स्त्रियांस तो आहे. ६. शास्त्राद्रूढिर्बलीयसी. या रूढी प्रान्तभेदानें भिन्न असतात.

आजच्या हिंदुकायद्याचे जे मूलभूत सिद्धान्त मानले जातात त्यांत वरील सहा सिद्धान्तांस अग्रस्थान आहे. हे सहा सिद्धान्त आजच्या हिंदुकायद्याचीं वैशिष्ट्यें आहेत. इतरांच्या वैयक्तिक कायद्यांत वरीलपैकीं एकहि सिद्धान्त मान्य केला जात नाहीं. यामुळें हे सिद्धान्त हिंदुकायद्याचे प्राणभूत आहेत असें मानलें जातें. म्हणून याच सिद्धान्तांची आतां क्रमशः चांचणी घेऊं.

## एकत्र कीं विभक्त ?

' हिंदुकुटुंब एकत्र कुटुंब असतें ' या सिद्धान्ताचा आजच्या कायद्याच्या भाषेंत ' Every Hindu family is presumed to be joint in

food, worship and estate ' असा आविष्कार केला जातो. त्यांतहि भिन्न ठिकाणीं राहणें हा विभक्तपणाचा पुरावा मानला जात नाहीं. अर्थात् भोजन विभिन्न ठिकाणीं असल्यास त्याकडे दुर्लक्ष केलें जातें. पूजनाचें बंड आतां संपुष्टांतच येत आहे. एवंच, राहणें, भोजन आणि पूजन यांस कायदा विशेष महत्त्व देत नाहीं, पण वडिलोपार्जित वांटप न झालेली इस्टेट मात्र कटाक्षानें ध्यानांत ठेवतो. यामुळें ज्यांची वडिलोपार्जित इस्टेट वांटप न झालेली असते ते सर्व, वांटप घेईपर्यंत, एकत्र कुटुंबांतील होत, एवढाच अर्थ एकत्र कुटुंबाचा आतां कायद्याप्रमाणें राहिला आहे. असलें हें एकत्र कुटुंब हिंदुकायद्यावरील कोणत्याहि जुन्या ग्रंथांत सांगितलेलें नाहीं. जुन्या ग्रंथांत ' एकत्र कुटुंबाचें गृहीतकृत्य ' ( presumption ) हा शब्दप्रयोग प्राचीन कायद्यांत कोठेंच सांपडत नाहीं. मनूनें ( ९-१११ )

एवं सह वसेयुर्वा पृथग् वा धर्मकाम्यया ।

म्हणजे भावांनीं एकत्र किंवा वेगळें रहावें असे दोन्हीं पक्ष सांगितले आहेत. कित्येक शास्त्रकार तर

विभागे तु धर्मवृद्धिः । ( गौतमधर्मसूत्र २८.४ )

म्हणजे विभक्तपणामुळें धर्मवृद्धि होते, असें सांगून विभक्तपणाचा पुरस्कार करतात. यावरून कुटुंबाचा अविभक्तपणा हें हिंदुकायद्याचें गृहीतकृत्य मानलें जाणें योग्य दिसत नाहीं. एकत्र राहणें असेल तरच एकत्र कुटुंब असा जुन्या कायद्याचा स्पष्ट आशय असतांना, प्रचलित कायद्यानें एकत्र राहण्याकडे दुर्लक्ष केलेलें आहे. आणि ' आम्ही विभक्त आहों ' असें म्हणणाऱ्या पक्षानें पुरावा दिला तरच विभक्तपणा मानला जाईल, अन्यथा हिंदुकुटुंब एकत्रकुटुंबच गृहीत धरलें जाईल, हा प्रचलित कायद्याचा दण्डक प्राचीन कायद्यांत दिसून येत नाहीं.

### बापाच्या संपत्तींत मुलाला वारसा

पुरुषप्राधान्य हा एक हिंदु कायद्याचा सिद्धान्त मानला जातो. यामुळेंच भाऊ असल्यास बापाच्या संपत्तींत बहिणीस वारसा देणें हिंदु कायद्याच्या सिद्धान्तपरंपरेस सोडून असल्याचें सांगितलें जातें. परंतु गेलीं सहस्र वर्षें हिंदु कायद्याच्या प्रमाणभूत म्हणून मानल्या गेलेल्या ' मिताक्षरा ' ग्रंथांतच भावांच्या एकचतुर्थांश बहिणीला द्यावा असें सांगितलें आहे ( तस्मात् पितुरूर्ध्वं कन्याप्यंशभागिनी । मिताक्षरा २. १२४ ). यावरून बापाच्या संपत्तींत मुलीला वारसा न देणें ही गोष्टच मूळ हिंदु कायद्याच्या सिद्धान्ताविरुद्ध ठरते.

### विधवेची संपत्ति

हिंदु महिलेच्या संपत्तीचे कायद्याप्रमाणें दोन प्रकार पडतात. त्यांपैकीं एकास 'स्त्रीधन' असें नांव असून दुसऱ्यास विधवेची संपत्ति असें म्हणतात. वारसाहक्कानें नवऱ्याच्या कुटुंबांतून जी संपत्ति स्त्रीला मिळते ती ' विधवेची संपत्ति ' होय, असें सामान्यतः म्हणावयास प्रत्यवाय नाहीं. अशा संपत्तीवर संपूर्ण स्वामित्व नसून मर्यादित स्वामित्वच मान्य केलें जातें. म्हणजे असली संपत्ति विशेष कारणाशिवाय तिला विकतां येत नाहीं. हें मर्यादित स्वामित्वाचें तत्त्व अनेक प्राचीन ग्रंथांत सांगितलें आहे. यावरून त्यास परंपरेचा आधार आहे हेंहि दिसून येतें. पण प्रश्न आहे तो असा कीं, विधवेच्या संपत्तीवर मर्यादित स्वामित्व हा हिंदु कायद्याचा मूलभूत सिद्धान्त आहे काय ? आणि या प्रश्नाचें स्पष्ट उत्तर ' नाहीं ' असेंच द्यावें लागेल. कारण वर उल्लेखिलेल्या हिंदु कायद्यांतील सर्वमान्य अशा 'मिताक्षरा' ग्रंथानें हा सिद्धान्त ( ? ) अमान्य केलेला आहे. महिलेच्या संपत्तीचे दोन प्रकार त्यास मान्य नाहींत. 'स्त्रीधन' याचा जो सांकेतिक ( पारिभाषिक ) अर्थ आजच्या हिंदु कायद्यांत केला जातो, तोच त्याला मान्य नाहीं. स्त्रीला देणगी, आहेर, वारसा इत्यादि कोणत्याहि प्रकारानें मिळालेलें धन ' स्त्रीधन 'च होय असें त्यानें निक्षून सांगितलें आहे.[1] म्हणून मर्यादित स्वामित्वाचें तत्त्व हिंदुकायद्याचा मूलभूत सिद्धान्त मानणें योग्य होणार नाहीं.

### संस्कार कीं करार ?

हिंदु विवाह हा संस्कार आहे, तो इतर धर्मांतील विवाहांप्रमाणें करार नाहीं; म्हणून तो अविच्छेद्य आहे असें कारण देऊन हिंदु लग्न कायद्याप्रमाणें मोडूं शकत नाहीं, असें आजच्या हिंदु कायद्याप्रमाणें समर्थन

१. रिक्थक्रयसंविभाग...प्राप्तं स्त्रीधनं, स्त्रीधनशब्दश्च यौगिको न पारिभाषिकः ।–मिताक्षरा २.१४३








केलें जातें. पण संस्कार हा करार नसतो हें खोटें आहे. कारण विवाहविधींतच वधूचा बाप ' धर्मे च अर्थे च कामे च नातिचरितव्या त्वया इयम्। ' असें जांवयास सांगतो आणि त्यावर तीनदां ' नातिचरामि ' असें जांवयाकडून प्रत्युत्तर घेत असतो. तेव्हां हिंदुविवाह हा जसा संस्कार आहे तसाच करारहि असल्यामुळें त्या कराराचा भंग झाल्यास विवाहविच्छेदाचा मार्ग ठेवणें क्रमप्राप्तच ठरतें. म्हणूनच त्रैवर्णिक महिलांस विवाहविच्छेदपूर्वक दुसरा पति करण्याची सवलत मनु-याज्ञवल्क्यांच्या स्मृतींपासून तों शूलपाणि-नन्दपण्डितांसारख्या अर्वाचीन निबंधकारांपर्यंत सर्वांनीं मुक्तकंठानें दिलेली आहे.[२] त्यावरून हिंदु लग्न आणि घटस्फोट यांविषयीं आजच्या कायद्यांत कसे विपरीत सिद्धान्त मान्य केले गेले आहेत हें दिसून येईल.

### अपसिद्धान्तांचा सुकाळ

येथपर्यंत या लेखाच्या आरंभीं उल्लेखिलेल्या सहा सिद्धान्तांपैकीं पहिल्या चारांचा व पांचव्यांतील अर्ध्यांचा परामर्श घेतला. आतां राहिलेल्या दीड सिद्धान्ताचा एकत्रच परामर्श घेऊं. शूद्र स्त्रियांत घटस्फोटाचा अधिकार आहे. आणि जातिपंचायतींनीं दिलेले घटस्फोट वैध ( कायदेशीर ) होत असें आजचा कायदा मानतो. आणि याचें कारण देतांना ' शास्त्राद्रूढिर्बलीयसी ' ( ग्रंथोक्त नियमांपेक्षां रूढि श्रेष्ठ होय ) असें सांगितलें जातें. पण हें सर्व प्रकरण मूळ हिंदु कायद्याशीं अत्यन्त विसंगत आहे. जुन्या शास्त्रग्रन्थांत विवाह आणि घटस्फोट या विषयांत त्रैवर्णिक आणि शूद्र स्त्रियांत तारतम्य केलेलें नाहीं. शूद्रांचे विवाह वैदिक मन्त्रांनीं करूं नयेत असें त्यांनीं सांगितलें आहे. पण हा भेद विवाहविधीविषयीं होय. विवाहाचे नियम ( सापिंड्य, पातिव्रत्य, पत्नीत्याग, पतित्याग ) असे भिन्न त्यांनीं सांगितलेले नाहींत. ते त्रैवर्णिक आणि शूद्र यांसाठीं सारखेच आहेत. म्हणून त्रैवर्णिक आणि शूद्र यांसाठीं भिन्न प्रकारचे नियम लागू

---

२. हिंदुविवाह विच्छिन्न होऊं शकतो असें सांगणारीं पुष्कळ वचनें आहेत. त्यांतील कांहीं वचनें पुढें दिलीं आहेत :

या पत्या वा परित्यक्ता विधवा वा स्वयेच्छया । उत्पादयेत् पुनर्भूत्वा स पौनर्भव उच्यते ॥ —मनु. ९.१७५
( पतीनें टाकून दिलेली अथवा विधवा स्त्री दुसऱ्याची भार्या होऊन जो पुत्र उत्पन्न करते त्यास पौनर्भव असें म्हणतात. )

या क्लीबं पतितमुन्मत्तं वा भर्तारमुत्सृज्य अन्यं पतिं विन्दते मृते वा सा पुनर्भूर्भवति । —वसिष्ठस्मृति १७.२१
( नपुंसक, पतित किंवा खुळ्या भर्त्याचा त्याग करून जी स्त्री दुसरा पति करते ती पुनर्भू होय. )

अष्टौ वर्षाण्युदीक्षेत ब्राह्मणी प्रोषितं पतिम् । अप्रसूता तु चत्वारि परतोऽन्यं समाश्रयेत् ॥
क्षत्रिया षट् समास्तिष्ठेदप्रसूता समात्रयम् । वैश्या प्रसूता चत्वारि द्वे वर्षे त्वितरा वसेत् ॥
न शूद्रायाः स्मृतः कालो न च धर्मव्यतिक्रमः । विशेषतोऽप्रसूतायाः संवत्सरपरा स्थितिः ॥

—नारदस्मृतिः १५.९८–१००

( प्रसूत ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य स्त्रियांनीं अनुक्रमें आठ, सहा आणि चार वर्षें, पण प्रसूत नसलेल्या त्याच स्त्रियांनीं अनुक्रमें चार, तीन आणि दोन वर्षें परागंदा झालेल्या नवऱ्याची मार्गप्रतीक्षा करून दुसऱ्याचा आश्रय ( नवरा म्हणून ) करावा. शूद्रेला असा ठराविक काळ नाहीं. तिला धर्मोल्लंघनाचा दोष नसतो. अप्रसूत शूद्र स्त्रीनें एक वर्ष वाट पाहून नंतर दुसरा नवरा करण्यांत दोष नाहीं. )

वरील वचनें अगदीं स्पष्ट आहेत. त्यांत त्रैवर्णिक आणि शूद्र असा स्पष्ट उल्लेख करून नारदानेंच केवळ वर्णाप्रमाणें परागंदा नवऱ्याची वाट पाहण्याची कालमर्यादा भिन्न सांगितली आहे. इतर विषयांत त्यानें तारतम्य केलेलें नाहीं. मनु-याज्ञवल्क्यांनीं तर सर्व वर्णांच्या महिलांस एकमुखीच नियम सांगितले आहेत. म्हणून घटस्फोटाविषयीं आपल्या कायद्यांत आणि रूढींत जो त्रैवर्णिक महिला आणि शूद्र महिला यांसाठीं भेद मान्य केलेला आहे तो सर्वस्वीं स्मृतिशास्त्राविरुद्ध मान्य असल्याचें व्यक्त होतें.



अनुक्रमणिका








समजणें, निदान असा पङ्क्तिप्रपंच करणें हा मूलभूत सिद्धान्त समजणें अयोग्य होय.

### जातिपंचायतींचें वंड

शूद्र जातींतील जातिपंचायतींकडून दिले जाणारे घटस्फोट आमच्या शास्त्रांत कोठेंच दिसत नाहींत. तरीहि केवळ रूढीस मान देऊन ते कायदेशीर समजले गेले आहेत. हायकोर्टांचे या विषयांतील निर्णय एकमुखी नाहींत. परस्परसंमतीनें घेतले गेलेले घटस्फोट अयोग्य होत असें मद्रास ( १७ मद्रास ४७९ ) हायकोर्टाचें मत असलें तरी तें मुंबई ( २ मुंबई १४० ) हायकोर्टास मान्य नाहीं. १९ मुंबई ५६ मध्यें तर मुंबई हायकोर्टानें जातिपंचायतींच्या या संबंधांतील अधिकारासच हरताळ फासला आहे. या संबंधांत सत्तर वर्षांपूर्वी श्री. विठ्ठल तुळशीराम हिरवे यांनीं लिहिलेलें पुस्तक पंचायतीच्या हुकूमशाहीवर विदारक प्रकाश टाकणारें आहे. त्यांच्या पुस्तकाचें नांव ' शूद्रजातींच्या पंचायतीचे अनर्थकारक परिणाम आणि त्यास उपाय ' असें असून सन १८८९ मध्यें हें पुस्तक प्रसिद्ध झालेलें होतें. त्यानंतर शूद्रवर्गांत बरीच जागृति झालेली असतां, ' परंपरागत घटस्फोट सुलभ आहेत ' असें म्हणून त्याचें समर्थन करणारांस उत्तर देण्याचा प्रयत्न होऊं नये हें आश्चर्य होय. असो. आजच्या कायद्यांत शूद्रांच्या घटस्फोटांस केवळ रूढीमुळें वाव दिला गेलेला आहे. मूळ कायद्याचें तत्त्व तसें आहे म्हणून नव्हे.

### रूढीचें प्राबल्य

मूळ शास्त्र बाजूस सारून अशा कित्येक गोष्टी आमच्या कायद्यांत मानाचें पान पटकावून बसलेल्या आहेत. याचें कारण आजच्या कायद्यानें शास्त्रापेक्षां रूढि प्रबल होय असा मानलेला सिद्धान्त होय. इंग्रजींत हा सिद्धान्त ' Under the Hindu system of law, clear proof of usage will outweigh the written text of the law ' अशा भाषेंत सांगितला जातो. आणि संस्कृत भाषेंत ' शास्त्राद्रूढिर्बलीयसी ' हें वचन त्याच्या समर्थनार्थ पुढें केलें जातें. परंतु आश्चर्य असें कीं असें वचन संस्कृत वाङ्मयांत कोठेंच नाहीं. पूर्वमीमांसेचा सिद्धान्त तर याच्या बरोबर उलट आहे. त्यांत श्रुतिस्मृतिविरुद्ध आचार अप्रमाण होत असें निक्षून सांगितलें आहे. एवढेंच नव्हे तर भारतांत देशभेदानें जे विभिन्न आचार रूढ आहेत ते तसें न ठेवतां सर्व शिष्टाचार सारखेच पाळले गेले पाहिजेत असा पूर्वमीमांसेचा कटाक्ष आहे. [ एतेषां ( श्रुतिस्मृतिसदाचाराणां ) विरोधे पूर्वपूर्वस्य बलीयस्त्वम् ।–मिताक्षरा १.७. व्यवस्थितदेशाचार-गृह्यधर्मसूत्रानिबद्धधर्माणामपि सर्वधर्मत्वम् । –तन्त्र-वार्तिक १.३.१६ ] या संस्कृत वचनांत ते सिद्धान्त सांगितलेले आहेत. वर जें ' शास्त्राद्रूढिर्बलीयसी ' असें वचन दिलें आहे तें लोकांच्या पदरचें आहे. कोणत्याहि शास्त्रग्रन्थांत तें नाहीं. पंचांगांत न लिहिलेल्या कांदेनवमी, गटारअमावास्या इत्यादि नांवांस ज्याप्रमाणें चलन मिळालें आहे तसेंच या वचनाचें समजावें.

आजच्या हिंदु कायद्याचे जे मूलभूत सिद्धान्त मानले जातात त्यांतील प्रमुख सहा सिद्धान्तांचें येथें समालोचन केलें आहे. त्यावरून हिंदु कायद्याची नीट समीक्षा होणें कां व कशी आवश्यक आहे हें ध्यानांत येईल असें वाटतें. हिंदु कायद्याच्या मूलभूत सिद्धान्तांप्रमाणेंच इतरांच्या कायद्यांचीहि याचप्रमाणें समीक्षा होईल तर, त्यांतूनच सर्व भारतीयांसाठीं समान वैयक्तिक कायदा निर्माण होऊं शकेल, असें वाटल्यामुळेंच हा विषय वाचकांपुढें मांडला आहे.

---

## साभार पोहोंच

**Why Hindu Code ?** ( *A historicl, analytical and critical exposition of the Hindu Code Bill* ) —by Prof. T. K. Tope, M. A., LL. B. and H. S. Ursekar, M. A , LL. B., Dharma Nirnaya Mandal ( Lonavla ) 1950. Rs. 1-8. pp. 92.

प्रा. स. वा. कोगेकर

# पुणें विद्यापीठ आणि अध्यापकांचें स्वातंत्र्य

## पूर्वपीठिका

पुणें विद्यापीठाचें काम म्हणजे ' आपल्या आजपर्यंतच्या कामाचाच विस्तार ' या भावनेनें 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी'च्या अधिकारी मंडळानें आपल्या आजीव-सेवकांनाहि पुणें विद्यापीठाच्या कामासाठीं सोसायटींतून सेवामुक्त होण्याची मुभा दिली. सोसायटीच्या संस्थांतून जरी पदवीपुढील व संशोधनाचेंहि कार्य कांहीं थोड्या प्रमाणांत होत असलें, तरी विशिष्ट क्षेत्रांत पारंगतता मिळविण्यासाठीं लागणारीं साधनें व सोयी सोसायटींत फारच अल्प प्रमाणांत उपलब्ध होत असल्यामुळें, हें कार्य विद्यापीठच अधिक प्रभावीपणें करूं शकेल, हें उघड होतें. आणि याच कारणास्तव आपल्यापैकीं ज्या मंडळींना विद्यापीठांत नव्यानें सुरू होणाऱ्या अध्यापन-संशोधन-कार्यासाठीं निवडलें जाण्याची शक्यता असेल, त्यांना विद्यापीठांत काम करण्याची मोकळीक असावी, असा निर्णय सोसायटीनें घेतला. एवढेंच नव्हे तर, या कार्यासाठीं आपल्या संस्थेंतील अध्यापकांनीं अवश्य पुढें यावें अशी भावनाहि वेळोवेळीं प्रकट करण्यांत आलेली होती. इतक्या आत्मीयतेनें विद्यापीठाकडे पाहिलें गेलें.

जेव्हां विद्यापीठानें राज्यशास्त्रासाठीं अध्यापक नेमण्याचें ठरविलें तेव्हां आपल्या आवडीच्या विषयांत प्रगति करण्याची संधि मिळणार, म्हणून वरील निर्णयानुसार मी निवड-समितीपुढें गेलों आणि माझी निवडहि झाली. या वेळीं सोसायटीच्या ' बृहन्महाराष्ट्र कॉमर्स कॉलेज 'च्या प्राचार्यपदावर मी होतों. ही जागा सोडून विद्यापीठांत मी जाऊं नये असा माझ्या कांहीं इष्ट-मित्रांनीं दिलेला सल्ला मला न पटण्याचें कारण एक तर, विद्यापीठांतील काम सोसायटीच्या कामाचीच पुढची पायरी होय, अशी इतरांप्रमाणें माझीहि भावना होती आणि दुसरें असें कीं, कॉमर्स कॉलेजच्या प्राचार्यपदीं राहून मला माझ्या आवडीच्या विषयावर सर्व लक्ष केंद्रित करणें शक्य नव्हतें. विद्यापीठाच्या कार्यकारिणीवरील जागा मात्र मला सोडावी लागणार होती, परंतु तिचा मोह मला फारसा वाटत नव्हता. म्हणून विद्यापीठांत जाण्यासाठीं मीं कॉमर्स कॉलेजच्या प्राचार्यपदाचें त्यागपत्र देण्याची इच्छा व्यक्त केली आणि सोसायटीच्या वरील धोरणाला अनुसरून कांहींहि अडचण उपस्थित न करतां माझ्या सहकाऱ्यांनीं तिला मान्यता दिली. सोसायटींतून ताबडतोब सेवानिवृत्त होण्याची आवश्यकता नव्हती; कारण, विद्यापीठांत गेल्यानंतर पांच वर्षेपर्यंत सोसायटींत पुनः परत येण्याची मुभा ठेवण्यांत आलेली होती व तितका काल विनावेतन रजा मिळण्याची तरतूद होती. बारा वर्षांहून अधिक काल सोसायटीच्या सेवेंत काढल्यानंतर विद्यापीठांत जाण्याचा ' प्रयोग ' मनाप्रमाणें यशस्वी न झाल्यास, 'स्वगृहीं' परत येण्याची सोय किती आवश्यक होती, हें आतां अनुभवानें सिद्ध झालें आहे.

१ जून १९५० ला मी विद्यापीठांतील जागेवर रुजू झालों. पहिल्या महिन्यांतच एक-दोन गोष्टी अशा घडल्या कीं, त्यामुळें मनांत अस्वस्थता उत्पन्न झाली. परंतु कालान्तरानें त्यांतून मार्ग निघेल अशा आशेनें मीं त्यांकडे दुर्लक्ष केलें. ऑगस्टमध्यें विद्यापीठाच्या कार्यकारिणीच्या आदेशानुसार तेथील अध्यापकांसाठीं एक पत्रक काढण्यांत आलें. त्या वेळीं










मात्र मी बराच बेचैन झालों. कारण, ध्यानींमनीं नसतां व आमच्या कामास सुरुवात होऊन एक-दोन महिने झाले नाहींत तोंच, ' तुमच्या युनिव्हर्सिटीबाहेरील कार्याची नोंद कचेरींत करा व यापुढें तुम्ही जें जें काम अंगावर घ्याल त्याचीहि माहिती पाठवा ' अशा आशयाचें पत्रक निघालें. ' बाहेरचें काम ' कशाला म्हणावें, असें काम कोणीं किती करावें, या कामामुळें अध्यापकांच्या विद्यापीठांतील कामावर अनिष्ट परिणाम होतो कीं काय ? हें कसें ठरविलें जाणार वगैरे प्रश्न उपस्थित झाले. कार्यकारिणी-वरील सभासदांच्या लहरी, पूर्वग्रह, मतें यांच्या अनुरोधानें या गोष्टी ठरणार, कीं प्राध्यापकांचे विषय, कल, कुवत व व्यक्तिमत्त्व यांच्यावर त्या अवलंबून राहणार, हा प्रश्न जितका अनिर्णीत तितकाच बेचैन करून सोडणारा होता. पण लवकरच असें आढळून आलें कीं, कार्यकारिणीवरील कोणा उपद्व्यापी सभासदाच्या घिसाडघाईमुळें असें पत्रक निघालें, कार्यकारिणीची त्याला मान्यता मिळालेली नव्हती व म्हणून तें मागें घेण्यांत आलें ! तरीसुद्धां अशा प्रकारचीं बंधनें विद्यापीठाच्या अध्यापकांवर लादलीं जावींत अशी कार्यकारिणीच्या कांहीं सभासदांचीं मतें असल्याचें बोललें जात होतें आणि या प्रकरणा-चा विचार करून अध्यापकांच्या नोकरीच्या अटी ठरविण्यासाठीं एक उपसमिति नेमण्यांत आलेली असल्याचें समजलें.

या ठिकाणीं एका गोष्टीचा उल्लेख मुद्दाम केला पाहिजे. ती अशी कीं, ज्या वेळीं मीं विद्यापीठांतील आसन स्वीकारण्याचा निर्णय घेतला त्या वेळीं तेथील नोकरीच्या अटी काय आहेत अशी पृच्छा देखील मीं केली नाहीं. वेतनासंबंधीं माहिती अर्थात् होती. वेतनश्रेणी ठरविण्याच्या वेळीं मी स्वतः कार्यकारिणीचा सभासदहि होतों व तेथील झालेल्या चर्चेत व नंतर घेतलेल्या निर्णयांत एक गोष्ट अगदीं स्पष्ट झालेली होती. ती ही कीं, पुणें विद्यापीठाची सांपत्तिक स्थिति आणि महाराष्ट्रांतील खासगी संस्थांची परंपरा लक्षांत घेतां, खासगी संस्थांतील आजीव-सेवकांना मिळणारें वेतन आणि विद्यापीठांतील आसनांचें वेतन यांत फारसें अंतर असूं नये. त्यामुळेंच पुणें विद्यापीठांतील वेतनश्रेणी अखिल हिंदुस्थानांत सर्वांत कमी ठरल्यास आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. ज्याप्रमाणें वेतनश्रेणी ठरवितांना खासगी संस्थांतील निःस्वार्थी आजीव-सेवकांच्या परंपरेचा आधार घेतला, त्याचप्रमाणें विद्यापीठांत काम करणाऱ्या अध्यापकांच्या नोकरीच्या अटींतहि तीच परंपरा ठेवली जाईल, किंबहुना विद्यापीठ इतरांना 'आदर्श' ठरतील अशा पद्धतीनें आपल्या अटी ठरवील अशी अपेक्षा होती ऑक्स्फर्ड, केंब्रिज या विद्यापीठांचा आदर्श आपल्या पुढें असल्याचा उल्लेख विद्यापीठांतील अधिकारी मंडळी नेहमीं करीत असत, व तेथील स्वतंत्र वातावरणाची कल्पना किंवा प्रत्यक्ष अनुभव-हि त्यांपैकीं कांहींना होता. आपली शैक्षणिक परंपरा आणि तदनुसार समाज-जीवनाशीं समरस होण्याची आपली वेळोंवेळीं प्रदर्शित झालेली इच्छा या दोन गोष्टी विचारांत घेतां विद्यापीठांतील काम म्हणजे फर्ग्युसन किंवा कॉमर्स कॉलेजाऐवजीं गणेश-खिंडींत बसून करावयाचें काम व अनेक अभ्यासविषय हाताळण्याऐवजीं एका विशिष्ट विषयावर लक्ष केंद्रित करून अध्ययन, अध्यापन व संशोधन करण्याचें काम, यापलीकडे आपल्या जीवनांत, मूल्यांत किंवा सभोंवतालच्या परिस्थितींत कांहीं फरक त्यामुळें होईल, ही कल्पना नव्हती. विशेषतः विद्यापीठांत काम करणाऱ्या व्यक्तीस स्वतंत्र देशां-तील एक नागरिक म्हणून ज्या गोष्टी करण्याची पूर्ण मोकळीक असावयास पाहिजे त्यावर देखील बंधन घातलें जाईल, अशी अपेक्षा करण्याचें कांहींच कारण नव्हतें.

पण कार्यकारिणीनें नेमलेल्या उपसमितीनें, विद्यापीठांतील अध्यापक हे मुख्यतः ' नोकर ' ( Employees ) आहेत, अध्यापक म्हणून समाजाच्या जीवनामध्यें त्यांचें असलेलें स्थान हें उपेक्षणीय आहे, अशा भूमिकेवरून त्यांच्या नोकरीच्या अटी ठरविण्याचें ठरविलें असावें. आणि ते जर नोकर तर कार्यकारी मंडळ हें त्यांचे मालक. तेव्हां या दोघांतील संबंध मालक-नोकर स्वरूपाचे झाले. मालकानें पगार द्यावयाचा तर त्यानेंच नोकराच्या कामाच्या अटी ठरविल्या पाहिजेत. त्यांत नोकराशीं विचारविनिमय करण्याचें कारण नाहीं.








आणि शिवाय, तो सर्व-काळ नोकर ( full-time employee ), तेव्हां आपण ठरवून दिलेल्या कामाव्यतिरिक्त त्यानें आपल्या परवानगीशिवाय कांहींहि करतां कामा नये हें सरळच आहे. सरकारी नोकरांनाहि अशाच नोकरीच्या अटी असतात. तेव्हां त्यांत गैर कांहींच नाहीं !...महाराष्ट्राच्या शैक्षणिक परंपरेंतून निर्माण झालेल्या विद्यापीठाच्या कार्यकारी मंडळांतील सभासदांचीहि हीच भूमिका आहे, यावर कोणाचा विश्वासहि बसणार नाहीं !

या ' मालकी ' वृत्तींतून निर्माण झालेल्या नोकरीच्या अटी मला अपमानास्पद वाटल्या; इतकेंच नव्हे तर, विद्यापीठांतील अध्यापकांच्या स्वातंत्र्यास त्या घातक ठरतील अशी खात्री झाल्यामुळें, १ जून १९५१ पासून मीं तेथील जागेचा राजिनामा दिला व डे. ए. सोसायटींतील अधिकाऱ्यांनीं माझी रजा रद्द करून मला परत फर्ग्युसन कॉलेजांत आजीव-सेवकाच्या कामावर रुजू करून घेतलें. ही सर्व घटना केवळ एका व्यक्तीपुरती मर्यादित स्वरूपाची असती, तर तिचा जाहीर खल करीत बसण्याचें कांहींच कारण नव्हतें. परंतु जरी राजीनामा देऊन मी एकटाच बाहेर पडलों असलों तरी, आपल्या शैक्षणिक व सामाजिक जीवनाशीं निगडित झालेल्या एका महत्त्वाच्या प्रश्नाशीं या घटनेचा संबंध पोहोंचत असल्यामुळें या घडामोडीच्या बुडाशीं असलेल्या वृत्तीचा, तत्त्वाचा आणि परिस्थितीचा विचार होणें आवश्यक आहे. विशेषतः महाराष्ट्राच्या संस्कृति-क्षेत्रांत नव्यानेंच स्थापन झालेल्या एका केंद्रस्थानीं ही घटना घडलेली असल्यामुळें, तिचे परिणामहि दूरगामी ठरणें अपरिहार्य आहे. तेव्हां या प्रश्नाची डोळसपणें चर्चा व्हावी या उद्देशानें हा लेख लिहिण्याचें योजिलें आहे.

### विद्यापीठांतील अध्यापकाच्या कार्याचें स्वरूप

कोठलेंहि काम करण्यासाठीं सिद्ध झालेल्या व्यक्तीनें तें काम हें आपलें प्रथम कर्तव्य मानलें पाहिजे आणि विद्यापीठांत अध्यापकाच्या जागीं असणाऱ्यांनीं त्याच न्यायानें आपल्या तेथील कामास प्राधान्य दिलें पाहिजे यांत शंका नाहीं; पण यांत्रिक पद्धतीनें, दररोज केवळ विशिष्ट वेळांत नेमून दिलेलें कार्य करणें, असें अध्यापकाच्या कामाचें स्वरूप नाहीं. नवे विचार, नव्या कल्पना आणि आपल्या विषयांचें अधिकाधिक सूक्ष्मग्राही निरीक्षण-परीक्षण यांकडे त्यास लक्ष द्यावयाचें असतें. त्यावर वेळ-काळाचें बंधन घालतां येत नाहीं. दररोज ११ ते ५ पर्यंत जेवढें होईल तितकेंच काम त्यानें करावें असें म्हणणें हास्यास्पद ठरेल. कारण त्याचें काम व तो यांत फरकच करतां येत नाहीं. विद्यार्थ्यांपुढें आपला विषय समजावून देतांना तो आपल्या संपूर्ण व्यक्तिमत्त्वाचा ठसा विद्यार्थ्यांच्या मनावर उमटवीत असतो; अर्थात् तें व्यक्तिमत्त्व ज्ञानानें, गुणानें, अनुभवानें जितकें अधिक समृद्ध तितकी त्याची विद्यार्थ्यांवर परिणाम करण्याची शक्ति अधिक. तेव्हां अध्यापन आणि संशोधन या अध्यापकाच्या दोन्ही प्रमुख कार्यांत त्याची कार्यक्षमता अधिकांत अधिक रहावी अशी तजवीज करावयाची असेल तर, त्यावर यांत्रिक पद्धतीचीं बंधनें कमींत कमी लादलीं पाहिजेत. अमुक वेळीं व्याख्यान देणें, अमुक वेळीं परीक्षा घेणें वगैरेसारखीं बंधनें आजच्या शिक्षण-व्यवस्थेंत अपरिहार्यच आहेत. पण त्यापलीकडे जाऊन अध्यापकाच्या जीवनाचें नियमन करूं पाहणें, म्हणजे अध्यापकाचें व्यक्तिमत्त्व मारून टाकण्यासारखें आहे.

यावर असा आक्षेप घेण्यांत येईल कीं, अध्यापकांना वरील प्रकारें अनिर्बंध स्वातंत्र्य दिल्यास त्याचा दुरुपयोग होऊन केवळ आळसांत किंवा मनोरंजनांत अगर ' अव्यापारेषु व्यापारां 'त ते काळ घालवितील; तसें झाल्यास अध्यापन व संशोधन या दोन्ही कार्यांची हानि होईल. पण यावर उपाय म्हणून अध्यापकांची चौकस बुद्धि, स्वयंस्फूर्त काम अंगावर घेण्याची इच्छा, स्वतंत्र विचार इत्यादींची ज्यांमुळें हानि होईल अशा प्रकारचीं बंधनें लादणें हा उपाय खास नव्हे ! तर ज्यांना खरोखरच अध्यापन-संशोधनांत गोडी आहे व ज्यांची त्या कामीं पात्रता आहे त्यांनाच अध्यापकांच्या जागेवर नेमणें, एवढेंच नव्हे तर, सर्व प्रकारच्या सोयी उपलब्ध करून दिल्यानंतरहि ज्यांच्या हातून योग्य दर्जाचें काम ( त्यांच्याच विषयांतील तज्ज्ञांनीं ठरवून दिलेल्या अभिप्रायाप्रमाणें, क्वचित् प्रसंगीं उडत उडत येणाऱ्या कंड्यांनुसार किंवा वैयक्तिक पूर्वग्रहानुसार कार्य-कारिणीनें ठरविल्याप्रमाणें नव्हे ! ) होणार नाहीं,

त्यांना योग्य इशाऱ्यानंतर कामावरून दूर करणें, हा उपाय होय. जोंपर्यंत अशा प्रकारें कामांत कसूर होत नाहीं तोंपर्यंत अध्यापकास आपलें कार्य स्वतःच्या पद्धतीनें आणि कार्यक्रमानुसार करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असलें पाहिजे.

पण आमच्याकडे साराच उलटा प्रकार दिसून येतो. जबाबदारीच्या जागेवर एखाद्या माणसाला नेमावयाचें, पण त्याला वागणूक देतांना मात्र तो जबाबदारीला पात्रच नाहीं अशी भावना ठेवावयाची! याचें एक लहानसें उदाहरण पुणें विद्यापीठानें आपल्या अध्यापकांसाठीं केलेल्या रजेच्या नियमांचें देतां येईल. युनिव्हर्सिटीच्या टर्म्सप्रमाणें उन्हाळ्याची सुटी सुमारें बारा आठवड्यांची असते. पण विद्यापीठानें नेमलेल्या अध्यापकांना त्यांतील निम्मीच मिळावी असा नियम करण्यांत आला आहे. कारण काय, तर ते 'नोकर' आहेत. युनिव्हर्सिटीशीं संलग्न असलेल्या कॉलेजांतील प्राध्यापकांप्रमाणें ते 'स्वतंत्र' थोडेच आहेत! किंवा कदाचित् अशीहि कल्पना असेल कीं, विद्यापीठांतील अध्यापकांना व्याख्यानें देण्याचें काम इतरांच्या मानानें कमी असल्यामुळें त्यांना सुटीची तितकीशी गरज नसते. ही मोठी सुटी म्हणजे केवळ चैनीची बाब, अशी कल्पना विद्यापीठाबाहेरील अनभिज्ञ लोकांनीं केल्यास एक वेळ क्षम्य ठरेल. पण विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांनीं या भूमिकेवरून आपलें धोरण ठरविलें असल्यास, आपल्या अध्यापकांसंबंधीं त्यांच्या मनांत किती गैरविश्वास आहे, याचें चांगलेंच दिग्दर्शन होतें. दैनंदिन कार्याचें दडपण नाहींसें होऊन विश्रान्तीप्रमाणेंच मोकळेपणानें वाचन, विचार, चर्चा, जमल्यास थोडा प्रवास किंवा हातीं घेतलेलें एखादें शैक्षणिक कार्य उरकणें यांसाठीं या सुटीचा उपयोग होतो. आणि तो तसा व्हावा हा या सुटीचा उद्देश आहे. अनुभव असा आहे कीं, आपल्याकडील बहुतेक अध्यापकांना आर्थिक टंचाईमुळें प्रवास वगैरे फारसा करतां येत नाहीं. त्यामुळें ते सुटींतहि आपापल्या ठिकाणींच असतात. सुटींतील कांहीं काळ युनिव्हर्सिटीचे पेपर्स तपासण्यांत जातो, आणि परीक्षांची पद्धति बदलली नाहीं तोंपर्यंत हें काम केल्याशिवाय गत्यंतर नाहीं, ही गोष्ट जाणत्या माणसाला सहज पटेल. या परिस्थितींत युनिव्हर्सिटीनें नेमलेले अध्यापक व विद्यापीठाच्या अधिकार-क्षेत्रांतील इतर अध्यापक यांच्यांत जो भेद करण्यांत आला आहे तो सर्वस्वीं गैर आहे, असें म्हटलें पाहिजे.

पण हाहि मुद्दा मी गौण मानण्यास तयार होतों. मतभेदाचा मुख्य मुद्दा अध्यापकांच्या विद्यापीठाच्या बाहेरील कार्यासंबंधींचा आहे.

### विद्यापीठाबाहेरील काम

कार्यकारी मंडळानें ठरविलेल्या नोकरीच्या अटींत यासंबंधीं असें म्हटलें आहे कीं, अध्यापक हा "विद्यापीठाचा सर्व-काळ नोकर असून त्यानें प्रत्यक्ष राजकारणांत भाग घेतां कामा नये...आणि कार्यकारी मंडळाच्या आगाऊ घेतलेल्या खास परवानगीशिवाय असें कोठलेंहि सवेतन किंवा विना-वेतन काम अथवा पद स्वीकारतां कामा नये कीं, ज्यामुळें त्याच्या (विद्यापीठांतील) कर्तव्यांत व्यत्यय येईल किंवा विद्यापीठाचा नोकर म्हणून होणाऱ्या त्याच्या उपयोगांत न्यूनता निर्माण होईल; व अशा प्रकारें व्यत्यय अगर न्यूनता आल्याचा निर्णय सर्वस्वीं कार्यकारिणीच्या हातीं राहील." [1]

या अटीचा सरळ अर्थ असा आहे कीं, अध्यापकाच्या विद्यापीठाबाहेरील प्रत्येक कामावर विद्यापीठाच्या कार्यकारिणीला निर्बंध घालतां येईल.

1 "...shall be a whole-time servant of the University and shall not participate in active politics,...and shall not, without the special sanction of the Executive Council of the University, previously obtained, accept any engagement or office, remunerative or otherwise, which is likely to interfere with due performance of his duties or to impair his usefulness as an employee of the said University, of which the Executive Council of the University shall be the sole judge."

कारण कोणतेंहि काम त्यानें करणें योग्य कीं अयोग्य हें ठरविण्याची सत्ता सर्वस्वीं कार्यकारिणीच्या हातीं रहाणार आहे—मग तें काम सवेतन असो किंवा विनावेतन असो, एखाद्या बाहेरील विद्यापीठाचा परीक्षक म्हणून असो, एखादा लेख लिहिणें असो अगर व्याख्यान देणें असो, सभेचें अध्यक्षपद असो किंवा परिषदेचें चिटणीसपद असो, गणेशोत्सवाचें असो किंवा शिक्षकसंघाचें असो. कार्यकारिणीच्या सभासदांचीं मतें, पूर्वग्रह, कल्पना आणि लहरी यांच्यावर हा निर्णय अवलंबून रहाणार. त्यांनीं योग्य विचार केला तर ठीकच; न केला तर, सत्तेपुढें नसून अध्यापकानें आपलें आचरण त्यांच्या निर्णयावर-हुकूम ठेवलें पाहिजे. आणि राजकारणांत तर परवानगी घेऊन देखील पडण्याची त्याला मोकळीक नाहीं !

अशा प्रकारच्या अटींच्या समर्थनार्थ असें सांगितलें जातें कीं, आपलें मुख्य काम सोडून अध्यापक इतर गोष्टींतच आपला वेळ घालवूं लागला, तर त्यावर मागाहून उपाय करण्यापेक्षां आधींच सावध होऊन त्याला दावणीला बांधून ठेवलेलें बरें. पण यांत एक गोष्ट अशी गृहीत धरली जाते कीं, चूक होईल ती नेहमीं अध्यापकाच्याच हातून. ' बाहेरचें काम ' समजून रास्त कार्यांत देखील अध्यापकाला भाग न घेऊं दिला जाण्याची शक्यता या पद्धतींत नाहीं, अशी काय खात्री आहे ? अध्यापकाला आपल्या अध्ययन-संशोधनांत कशामुळें व्यत्यय येतो हें समजत नाहीं, पण कार्यकारिणीवरील बारभाईंना मात्र तें बरोबर समजतें, असें का गृहीत धरावें ? राजकीय हेतूंमुळें किंवा वैयक्तिक स्पर्धेमुळें कार्यकारिणीवरील सभासद आपल्या अधिकाराचा दुरुपयोग करणार नाहींत का ? सत्तेचें प्रदर्शन करण्यासाठीं शैक्षणिक दृष्ट्या मुळींच अप्रस्तुत नसणाऱ्या सवेतन वा निर्वेतन कामांत खो घालण्याचा प्रकार कधीं झालेला नाहीं का ? तसेंच रिकामपणांत समाजसेवा करण्यापेक्षां पत्ते कुटत बसण्यांत अध्यापकांचें हित अधिक आहे असें समजतां येईल काय ? आणि यांपैकीं दुसऱ्या प्रकारच्या कामांत कालापव्यय कमी होतो किंवा अध्यापकाच्या विद्यापीठांतील उपयुक्ततेला बाध येत नाहीं असें थोडेंच आहे ! मग पत्ते खेळणें, गुप्त हेरांच्या कथा वाचणें वगैरे गोष्टींना परवानगीची जरुरी नाहीं आणि समाजसेवेला मात्र आहे, असें कां ? का परवानगी मिळविण्यासाठीं कार्यकारिणीवरील चार सभासदांकडे खेटे घालण्यास लावल्यामुळें अध्यापकाच्या ' नोकर ' या नात्याची त्याला जाणीव करून देण्याचा उद्देश त्यामागें आहे ?

### अध्यापक आणि राजकारण

राजकारणासंबंधींची अटहि आश्चर्यकारक आहे. या प्रकारची अट पूर्वीच्या म्हणजे परकीय सरकारच्या अंमलांत लादली जात असे. पण तिच्याविरुद्ध वेळोवेळीं मतप्रदर्शन करण्यांत आलें आहे हें लेखाच्या पुढील एका भागावरून समजून येईल. परकीय राज्यकर्त्यांना स्वतःचें आसन सांभाळण्यासाठीं असें बंधन घालणें आवश्यक वाटलें असेल. कारण, त्या वेळचें राजकारण म्हणजे सरकारविरोध असें समीकरणच होऊन बसलें होतें. शिक्षणसंस्थांवरील आपल्या आर्थिक व नैबंधिक सत्तेचा उपयोग पूर्वींचे राज्यकर्ते या प्रकारानें बंधनें घालण्यास करीत असत. पण स्वतंत्र हिंदुस्थानांत राजकारणाला भिण्याचें कारण नाहीं—सरकारला नाहीं आणि विद्यापीठाला तर त्याहून नाहीं ! लोकशाही पद्धतीच्या सरकारला परमतसहिष्णुता मान्य असली पाहिजे असा सर्वमान्य दंडक आहे. त्यामुळें राजकारणांत विरोधी पक्षाचें अस्तित्व मान्य करणें, सरकारवर टीका करण्याचें स्वातंत्र्य अबाधित राखणें, हीं सरकारचीं कर्तव्यें होऊन बसलीं आहेत. पण सरकारला निदान आपलें धोरण आणि विरोधी धोरण असा फरक तरी करतां येतो. विद्यापीठाला स्वतःचें असें राजकीय धोरणच नसतें. त्यामुळें विद्यापीठाच्या अध्यापकांचें कोणत्याहि पक्षाचें राजकारण असलें, तरी तें विद्यापीठाला विरोधी असूंच शकत नाहीं. अशा परिस्थितींत प्रत्यक्ष राजकारणांत भाग घेण्याची बंदी घालून अध्यापकांच्या नागरिक म्हणून प्राप्त होणाऱ्या रास्त हक्कावर आक्रमण करण्याचा विद्यापीठाला अधिकार काय ? बरें, ' प्रत्यक्ष राजकारण ' म्हणजे काय ? प्रचलित राजकीय प्रश्नांवर मतप्रदर्शन करणें, सरकारी धोरणावर टीका करणें, तसेंच विधायक सूचना करणें या गोष्टी देखील प्रत्यक्ष राजकारणांतच मोडतात आणि त्यांनाहि बंदी करण्यांत विद्या-








पीठानें काय साधलें ? अध्यापकाची कार्यक्षमता त्यामुळें वाढणार आहे कीं कमी होणार आहे ? राज्यशास्त्राच्या अध्यापकानें प्रत्यक्ष राजकारणांत भाग घ्यावयाचा नाहीं, तसेंच अर्थशास्त्राच्या अध्यापकानें आर्थिक घडामोडींत भाग घ्यावयाचा नाहीं; रसायनशास्त्राच्या अध्यापकानें रसायनांच्या उत्पादनासंबंधींच्या प्रक्रियांत 'ब्र' काढावयाचा नाहीं, वाङ्मयाच्या अध्यापकानें 'नवकाव्या'विषयींच्या प्रचलित चर्चेत भाग घ्यावयाचा नाहीं—अशा प्रकारें विद्यापीठाच्या अध्यापकांनीं आपापल्या क्षेत्रांतील प्रचलित घडामोडींपासून पूर्णपणें अलिप्त राहून केवळ विद्यापीठांतील कार्याला एकनिष्ठेनें वाहून घ्यावयास हवें, अशी कदाचित् कार्यकारिणीच्या सभासदांची कल्पना असावी !

राजकारणासंबंधींचा नियम आणि इतर बाबतींतील वेडगळ निर्बंध यांच्या बुडाशीं दोन गोष्टी प्रामुख्यानें दिसून येतात. एक म्हणजे गुलामी वृत्ति आणि दुसरी समाजविमुखता. ब्रिटिश राज्य जरी येथून गेलें असलें तरी त्या राज्यांतील कल्पना अजून तशाच घर करून बसल्या आहेत. स्वतंत्र देशांत 'राजकारण' असें सामाजिक जीवनाचें निराळें दालन असत नाहीं. इतर सर्व सामाजिक घडामोडींप्रमाणेंच प्रचलित राजकीय घडामोडींकडे पाहिलें पाहिजे, ही कल्पना अजून कार्यकारिणीच्या सभासदांनीं आत्मसात् केलेली नाहीं. तसेंच शिक्षणक्षेत्रांत सरकारचें दडपण येऊं नये म्हणून स्वायत्ततेच्या तत्त्वावर निर्माण केलेलें विद्यापीठ, सरकारलाहि लाजवील अशा प्रकारें, आपल्या शिक्षकांवर दडपण कसें आणूं शकतें, याचा मासला आपणांला या नियमांत पाहावयास मिळतो.

शिक्षण आणि समाज यांच्यांत फार जिव्हाळ्याचा संबंध आहे ही गोष्टहि कार्यकारिणीला मान्य नसावी. 'बाहेरचें काम' म्हणून ज्याला म्हटलें जातें तें सर्वच्या सर्व खरोखरीच 'बाहेरचें' असतें काय ? कीं शिक्षकाच्या कर्तव्यांतच त्याचा समावेश होतो ? नागरिकशास्त्र शिकवणाऱ्या प्राध्यापकास आपल्या गांवच्या नगरपालिकेंत सभासद म्हणून काम करण्याची संधि मिळाल्यास, प्रत्यक्ष अनुभवामुळें स्वतःच्या विषयाचें त्याचें आकलन अधिक सखोल होईल. विद्यार्थ्यांनाहि त्याचा फायदा मिळेल. पण हें समाजकार्यच नव्हे तर 'प्रत्यक्ष राजकारण', तेव्हां पुणें विद्यापीठाच्या अध्यापकांना त्यांत पडतांच येणार नाहीं ! मला असें म्हणावयाचें नाहीं कीं, प्रत्येक अध्यापकानें अशा प्रकारचें 'प्रत्यक्ष काम' केलेंच पाहिजे. ती गोष्ट ज्याची त्याची आवड, कुवत, व्यक्तिमत्त्व यांवर अवलंबून राहील. पण या गोष्टी अनुकूल असल्यासहि सध्यांच्या बंदीमुळें त्यांचा उपयोग होणार नाहीं. अध्यापकाच्या 'उपयुक्तते'चा अत्यंत संकुचित अर्थ केल्यामुळेंच ही समस्या निर्माण झाली आहे यांत शंका नाहीं. विशेषतः राज्यशास्त्र, अर्थशास्त्र अशा समाजशास्त्राच्या अध्यापकांना ही बंदी इतरांच्या मानानें अधिक प्रमाणांत जाणवल्यास नवल नाहीं. कारण समाज व समाजजीवन ही या शास्त्रांची प्रयोगशाळा आहे; तेथें वावरण्यास बंदी करणें म्हणजे या शास्त्रांच्या प्रगतीस खीळ घालण्यासारखें आहे.[२]

आपल्या विद्यापीठांतील कर्तव्याला सांभाळून जितकें म्हणून सामाजिक जीवनांत मिसळणें शक्य असेल तितकें मिसळण्याची अध्यापकांना मुभा असली पाहिजे. अध्यापनक्षेत्राकडे सत्प्रवृत्त, हुषार व चिकाटीचे नागरिक आकर्षित करून घेण्याचा तो एक मार्ग आहे. त्यामुळें विद्यापीठ व समाज या दोहोंचीहि समृद्धि होणार आहे. परवानगी मागण्याची आवश्यकता निर्माण केली कीं, परवानगी मागण्यापेक्षां संकल्पित कार्य न करण्याकडे प्रवृत्ति होते, असा सर्वत्र अनुभव आहे. बरें, ज्याला शैक्षणिक कार्याची आवड किंवा आपल्या प्रतिष्ठेची व उन्नतीची चाड नाहीं, तो त्यानें शैक्षणिक कार्य

2 "A Social Scientist has the whole community for his laboratory. Contact with actual life alone will reveal how businessmen and industrialists behave and how labour and their unions will do..." —Report of the Radhakrishnan Commission on University Education, Vol. I p. 155.

चांगलें करावें म्हणून कितीहि कडक निर्बंध लादले तरी, शैक्षणिक कार्यांत प्रगति करणार नाहीं. कायदे करून ज्याप्रमाणें माणसाला नीतिमान् बनवितां येत नाहीं, त्याचप्रमाणें इतर कामावर बंदी-हुकूम लादून अध्यापकाचें लक्ष शैक्षणिक कार्यावर केंद्रित करतां येणार नाहीं. कांहीं अध्यापकांच्या हातून चुका झाल्या, तरी त्यामुळें होणारी हानि सबंध अध्यापक-वर्गावर कडक निर्बंध घालण्यामुळें होणाऱ्या हानीच्या पासंगालाहि पुरणार नाहीं. चुका दुरुस्त करतां येतात, पण व्यक्तिमत्त्वाला आलेलें पंगुत्व अध्यापकाला कायमचें अधू बनवितें.[3] आणि ज्याप्रमाणें विद्यार्थ्यांच्या भावी कर्तबगारीचा पाया विद्यापीठानें घालवयाचा असतो, त्याप्रमाणें अध्यापकांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासास पूर्ण वाव देण्याची जबाबदारी विद्यापीठावर असते. यासंबंधीं अत्यंत विचारपरिप्लुत अशी चर्चा इंग्लंडमधील युनिव्हर्सिटीक्षेत्रांत खळबळ उडवून देणाऱ्या 'ब्रूस ट्रस्कॉट' या टोपण नांवानें लिहिणाऱ्या एका अनुभवी प्राध्यापकाच्या 'Red Brick University' या पुस्तकांत केलेली आहे. (विशेषतः भाग २, प्रकरण ३, विभाग २ पाहा.) विद्यापीठांतील माझ्या एक वर्षाच्या कामाच्या अहवालांत माझ्या विषयापुरती माझी भूमिका मीं स्पष्ट केलेली आहे[4].

आपली परंपरा

वास्तविक पाहतां पुणें विद्यापीठांत अध्यापकांच्या स्वातंत्र्यासंबंधीं मुळींच बांधा यावयास नको होता. कारण, ज्या भूमींतून या विद्यापीठाची निर्मिति झाली आहे, त्या महाराष्ट्रांतील आधुनिक शैक्षणिक परंपरेंत अध्यापकांना समाज-जीवनांत सहभागी होण्याची संपूर्ण मोकळीक देण्याची प्रथा अगदीं प्रथमपासूनच पडलेली आहे. याला दाखल्यादाखल आमच्या 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी'च्या इतिहासाकडे नजर टाकली तरी पुरें. १८८२ सालीं, म्हणजे 'न्यू इंग्लिश स्कूल' स्थापन झाल्यानंतर दोनच वर्षांनीं, मुख्याध्यापक आपटे यांनीं अध्यापकांच्या 'बाहेरच्या कामा'संबंधीं करण्यांत येणाऱ्या टीकेला बिनतोड उत्तर दिलेलें आहे. तें असें कीं, "गंजिफा, बुद्धिबळें आणि सोंगट्या खेळण्याचे अड्डे आहेत यावरून रिकामपणा असतो हें सिद्ध होतें; रिकामा वेळ कसा घालवावा हें प्रत्येकाच्या आवडी-निवडीवर अवलंबून राहील. आम्हांला असें वाटतें कीं, आपला वेळ स्वतःचें व समाजाचें शिक्षण

3 "I would plead, then, with great earnestness, that all academic persons...be appointed only after the most careful inquiry, and, once chosen, be treated like persons in positions of trust, and given as much freedom as possible. The risk of their making an occasionally faulty decision is far less harmful than the much greater risk of blunting the keen edge of an imaginative mind and an energetic disposition, which in a Department under a comparatively young man, may not be rectifiable for a quarter of a century" — Bruce Truscot, Red Brick University, p. 320 (Pelican edition 1951)

"4 When the Head of the Dept. entered on his duties on the 1 st of June 1950, after resigning (with the permission of the D. E. Society) his office as Principal of one of the constituent colleges of the University, he was looking forward to his work of building up one of the Departments of the University with great hope. But he was soon disappointed to find that the terms and conditions of service for University-appointed teachers, which were under contemplation of the authorities, were based on a bureau-

(ही तळटीप पुढील पानावर चालू)

घडवून आणण्यासाठीं आणि शालोपयोगी पुस्तकें लिहिण्याच्या कामीं वेंचावा.''[५] त्यावेळीं राजकीय व सामाजिक कार्यांत संस्थेंतील सर्वच मंडळी भाग घेत होती. १८८९ सालीं आगरकरांनीं लिहिलेल्या एका इतिवृत्तांत या प्रथेचा पाठपुरावा केलेला आहे व त्यावर निर्बंध आणणें प्रत्यक्ष व्यवहारांत कसें घातक टरेल हें जोरदारपणें मांडलें आहे.[६]

१८९८ सालीं प्लेगच्या धामधुमींत 'सुधारकां'-तील देवधर-पटवर्धन यांचे कडक लेख आणि गोखल्यांचें माफी-प्रकरण यांमुळें मोठेंच वादळ झालें, व सोसायटींतील कार्यकर्त्यांनीं राजकारणांतून संन्यास घ्यावा, असें सरकारनें टुमणें लावलें. पण तें मान्य करून आपले नागरिकत्वाचे हक्क घालविण्यास सोसायटीचे सभासद तयार नव्हते. शेवटीं तडजोड अशी निघाली कीं, आजीव-सभासदांनीं स्वतः होऊन असें नैतिक आश्वासन ( pledge ) द्यावें कीं, कोठलेंहि राजकीय वृत्तपत्र चालविण्याचें किंवा राजकीय संस्थेंत पदाधिकारी होण्याचें काम ते अंगावर घेणार नाहींत, तसेंच एखाद्या विशिष्ट चळवळीपासून अलिप्त रहाण्याचा आदेश जर गव्हर्निंग बॉडीनें त्यांना दिला, तर तो मान्य केला जाईल आणि आपल्या एकंदर सार्वजनिक वर्तणुकी-संबंधीं ते गव्हर्निंग बॉडीला जबाबदार राहतील. यांपैकीं प्रत्यक्ष व्यवहारांत पहिलीं दोनच बंधनें समजलीं पाहिजेत. कारण, गव्हर्निंग बॉडीनें सार्वजनिक कार्यासंबंधीं कसलेंहि दडपण आतांपर्यंत कोणाहि आजीव-सभासदावर आणलेलें नाहीं. त्यामुळें आज व्यवहारांत या दोन बंधनांशिवाय राजकीय किंवा सामाजिक कार्याच्या बाबतींत संस्थेच्या सभासदांवर अन्य बंधन नाहीं असें म्हणतां येईल.[७] ( अर्थात्, जातिद्वेषजनक आणि हिंसक चळवळीं-पासून आजीव सभासद अलिप्त राहिले आहेत व पुढेंहि रहातील यांत संशय नाहीं. ) पण सरकारचें प्रथम एवढ्यावर समाधान झालें नाहीं. शिक्षकांनीं राजकारणापासून पूर्णपणें अलिप्त राहिलें पाहिजे असें सांगण्यांत आलें. त्याला संस्थेची मान्यता मिळणें शक्य नव्हतें व अशी अपमानास्पद अट स्वीकारण्या-पेक्षां सरकारी ग्रँट न घेतलेली बरी, असा विचार

-cratic conception of the teacher's role in society against which the best amongst us had always protested in the past. He felt that it would not be possible for him to give his best to the University, if he were to accept those conditions. He believes that the study of Politics, like that of other social sciences, is not a cloistered pursuit; it thrives on a living contact with reality. The extent of this contact had best be left to the teacher to decide according to his temperament and the nature of his special studies. The Head of the Dept. believes that the spirit informing the new terms and conditions of service, taken along with the rigid construction of rules to which the University authorities have shown themselves to be prone, would militate against the maintenance of that atmosphere of freedom and initiative without which it is impossible to cultivate a special study like Politics. A full exposition of his objections to the new conditions of service was given by him in a speech at the meeting of the Court during the last week of March 1951. When it did not evoke right response from the authorities concerned, he reluctantly decided to tender the resigantion of his post with effect from the 1st of June, 1951."

५ डे. ए. सो. इतिहास, भाग १, पान ११४. ६ किता. पान १२६.

७ डे. ए. सो. इतिहास, भाग २ – ( 'फर्ग्युसन कॉलेज', ले. डॉ. र. पु. परांजपे ) पान १६.

प्रभावी झाला. १६ जून १८९८ रोजीं गव्हर्निंग बॉडीच्या अध्यक्षांनीं सरकारला लिहिलेल्या पत्रांत राजकीय असंतोष व राजकारण यांत फरक करून सर्वसाधारण राजकारणांत भाग घेण्यास मनाई करणें बरोबर नाहीं असा मुद्दा मांडला व शेवटीं सरकारनेंहि आपला हट्ट सोडला. या सर्व प्रकरणाचें सोसायटीच्या इतिहासांत जें मूल्यमापन केलें आहे त्यावरून शिक्षणपेशांतील सर्व मंडळींच्या राजकारणांत भाग घेण्याच्या हक्कावर आलेलें संकट परतवून लाविलें गेलें, असें मानतां येईल.[८]

१९१२ सालीं पुनः एकदां शिक्षकांच्या हक्कांवर घाड आली. राजनिष्ठेची शपथ घेण्याचा सरकारनें आग्रह धरला आणि शपथेच्या नमुन्यांत पुढील वाक्य घातलें : " हिंदुस्थान सरकारविरुद्ध अगर सरकारच्या कोणत्याहि निर्णयाविरुद्ध होणाऱ्या राजकीय किंवा निमराजकीय, कोणत्याहि चळवळींत किंवा सभेंत भाग न घेण्याचें बंधन मजवर राहील." या मसुद्यावर सही करणें म्हणजे १८९८ सालच्या हक्कांवर पाणी सोडण्यासारखें होतें आणि या वेळींहि 'सरकारचा रोष पत्करला पण आपलें हक्कसंरक्षण केलें पाहिजे' अशी भूमिका आजीव-सभासदांनीं घेतली. सर रामकृष्ण भांडारकर त्या वेळीं सोसायटीच्या गव्हर्निंग बॉडीचे अध्यक्ष होते. त्यांनीं सरकारला लिहिलेल्या पत्रांत संस्थेंतील कार्यकर्त्यांची भूमिका स्पष्ट करतांना असें म्हटलेलें आहे कीं, "राष्ट्रोन्नतीच्या कार्यांत त्यांनाहि सहभागी होण्याची स्वाभाविक इच्छा आहे आणि केवळ शिक्षणकार्याला त्यांनीं वाहून घेतलें आहे...एवढ्याच कारणासाठीं जर सार्वजनिक जीवनांतून त्यांना वगळण्यांत येणार असेल, तर ती एक अनिष्टापत्तिच ( irony ) समजली पाहिजे."[९] पण सरकारनें हा युक्तिवाद सर्व शिक्षकांच्या बाबतींत मान्य न करतां फक्त आजीव-सभासदां-पुरताच मान्य केला आणि त्यांच्या शपथेंतून वरील वाक्य गाळण्यास संमति दिली. कालान्तरानें ही शपथेची पद्धतच बंद पडली. त्यामुळें शिक्षकांच्या स्वातंत्र्यावरील हीं बंधनेंहि क्षणभंगुरच ठरलीं.

डे. ए. सोसायटींतील कित्येक सभासद १९२० सालापर्यंत राष्ट्रीय सभेचे सभासद असत व त्यां-पैकीं कित्येक दरसालच्या अधिवेशनासहि हजर राहात. प्रत्यक्ष राजकारणांत काय किंवा सामाजिक चळ-वळींत काय, प्रथमपासून आजपर्यंत तेथील कार्यकर्ते भाग घेत आले आहेत. कोणीं किती भाग घ्यावा हा प्रश्न ज्याच्या त्याच्या मताचा आणि व्यक्तिमत्त्वाचा असणार हें उघड आहे. पण शिक्षकाचें कार्यक्षेत्र कॉलेज किंवा शाळेपुरतेंच मर्यादित आहे असें आतांपर्यंत कधींच मानण्यांत आलेलें नाहीं.

विद्यापीठांत संशोधनकार्यावर भर अधिक दिला जाणार हें खरें असलें, तरी सर्वच संशोधन केवळ ग्रंथालयांत बसूनच करण्यासारखें असतें असें मानणें चूक आहे. विशेषतः समाजविषयक शास्त्रांत तर अशा संशोधनास अजून तरी मर्यादितच स्थान आहे. कारण समाजांतील शक्ती-प्रवृत्तींची ओळख होण्यासाठीं अध्यापकास सामाजिक घडामोडींचें ज्ञान व त्यांत भाग घेण्याचा अनुभव असणें ही महत्त्वाची गोष्ट समजली जाते. पूर्वींच्या जमान्यांत सर्व सामाजिक चळवळींचा मुख्य भर परकीय सत्ते-विरुद्ध निदर्शन करून जनतेंत असंतोष फैलावण्या-वर असल्यामुळें, सामाजिक जीवनांतील विविध अंगोपांगांचा प्रत्यक्ष अनुभव मिळविण्याची संधि मर्यादित प्रमाणांतच होती. आज ती स्थिति पालटली आहे. स्वराज्यांत विधायक कार्यावर साहजिकच भर दिला जाणार. अशा वेळीं या विधायक कार्याला हातभार लावण्याची संधि अध्यापकांना मिळवून देण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. त्यांतूनच समाजाच्या गरजा आणि मूल्यें यांची ओळख त्यांना होऊन त्यांच्या कार्यास दिशा लागणार आहे. अध्यापक हा जर समाजविमुख राहिला तर, अध्यापक व समाज या दोघांचाहि तोटा होईल ही गोष्ट वादातीत समजली पाहिजे. फर्ग्युसन कॉलेजच्या जवळच असणाऱ्या 'गोखले अर्थशास्त्र-संशोधन'-संस्थेकडे पाहिल्यास, संशोधनाचें कार्य करण्याचें कार्यक्षेत्रहि संस्थेपुरतेंच मर्यादित असावें लागतें असें दिसत नाहीं.

---

८ कित्ता, भाग १, पान १७१

९ कित्ता, पान २२९








## पुणें विद्यापीठ आणि अध्यापकांचें स्वातंत्र्य

पण पुणें विद्यापीठाच्या कार्यकारिणीला तसें वाटत नाहीं. सरकारी नोकरांसाठीं नोकरशाही जमान्यांत केलेले नियम, किंवा आपली पूर्वपरंपरा नसलेल्या अन्य प्रांतांतील कांहीं विद्यापीठांचे नियम, तिला अधिक सयुक्तिक वाटतात. आणि ज्या 'नोकर'दारी अध्यापकव्यवस्थेबद्दल सर्वत्र असमाधान व्यक्त करण्यांत आलें आहे ती 'नोकर'-दारी पद्धति विद्यापीठांत सुरू करून तींतून उत्तम प्रतीचें शैक्षणिक कार्य केलें जाईल, असा तिला विश्वास वाटतो. त्यामुळें विद्यापीठानें नेमलेल्या आठ-दहा अध्यापकांप्रमाणेंच विद्यापीठाच्या वतीनें शिक्षण देणारे व विद्यापीठाची मान्यता मिळालेले असे जे इतर कॉलेजांतील व संशोधनसंस्थांतील प्राध्यापक आहेत त्यांच्यावरहि, उठल्यासुटल्या नियम करून आपली 'कर्तबगारी' सिद्ध करण्याची पराकाष्ठा करणाऱ्या कार्यकारिणीवरील सभासदांकडून सध्यांचे निर्बंध लादले जाण्याचा धोका निर्माण झाला आहे.

तसें झाल्यास पुणें विद्यापीठानें महाराष्ट्राच्या शैक्षणिक परंपरेंतील एका मौलिक हक्कावर प्रहार करून आपल्या कार्यास सुरुवात केली असें म्हणावें लागेल. ही आपत्ति टाळण्यासाठीं महाराष्ट्रीय अध्यापक आणि जनतेचे पुढारी यांनीं जागरूकपणें योग्य दिशेनें प्रयत्न केला पाहिजे. आज विद्यापीठांतील नोकरीच्या अटी अमान्य झाल्यास फर्ग्युसन कॉलेजसारख्या संस्थेंत काम करणें तरी शक्य आहे. पण वेळींच सावध न झाल्यास अध्यापकपेशांतील मंडळींना मन मारून, उच्च शिक्षणाच्या 'नोकरशाहीकरणा'पुढें निमूटपणें मान तुकवावी लागेल किंवा आपल्या व्यवसायांतून परागंदा व्हावें लागेल इतकी गंभीर परिस्थिति आहे.

---

## अमृतकलश

जिच्यासाठिं तें घडलें सारें
रामायण, ती दीन जानकी
खाईमध्यें गडपुनि गेली.
मातीमातेच्या कुसव्याची
कन्या ती मातीस मिळाली
  वसल्या नटल्या किती अयोध्या
  अखेर उरल्या साऱ्या वंध्या
  अवशेषांचे ढीग-ढिगारे...
  उपसुनि तुकडे कुणी मांडले
  सुतकी जिज्ञासेनें कोणी
  कांचेंतुनि वाचती लेबलें
युगान्तरांच्या चाकावरती
मातीचा हा गोळा भोंगित
उद्धत हांसू सम्राटांचें
औट घटींचीं वैभवस्वप्नें
आसूं सर्वांचे, साधूंचें
उदात्त केविलवाणें मरणें
  आज उबगल्या चाकावरती
  चिखलाचा हा गोळा सुकतो

  हिरोशिमाच्या हिंस्र धगीनें
  लकव्यानें जणुं पेंगुळलेलीं
  कुंभाराचीं बोटें लोंबत
  भ्रमिष्ट वेडे चाक भरकटे
  मातीचा हा गोळा पेंगत
  'माती असशी मातिस मिळशी'
  आत्मा कण्हता ओंगळ गीत
त्याच मातिच्या गर्भामधुनी
साधूंच्या त्या दधीचि-अस्थी
वज्राचे हुंकार घालती
गभीर उज्ज्वल घुमतो नाद
कणाकणांतुनि उठते साद
  माती थरारते स्पर्शानें
  सृजनाच्या या नादलहरिनें
  फिरतें चाक नि घडेल अद्भुत
  कलश, जयांतुनि कांठोकांठ
  ओसंडेल अनामय अमृत
  अमरांसाठीं. अमर नव्हे का
  मातीची ही मानवजात ?

—दि. के. बेडेकर







श्री. र. के. खा डि ल क र

# कम्युनिस्ट पक्षाचें नवें राजकारण

गेलें वर्ष दीड वर्ष हिंदी कम्युनिस्ट पक्षांत पक्षाच्या भूमिकेसंबंधीं, धोरणासंबंधीं व लढ्याच्या पद्धतीसंबंधीं मोठा अंतर्गत संघर्ष सुरू होता. १९५० च्या जानेवारींत ' कॉमिन्फॉर्म 'च्या मुखपत्रांत हिंदी परिस्थितीला उद्देशून अभिप्राय व्यक्त झाल्यानंतर, कलकत्त्याच्या बैठकीपासून हिंदी कम्युनिस्ट पक्षानें अंगीकारलेल्या धोरणाच्या युक्तायुक्ततेबद्दल पक्ष-कार्यकर्त्यांच्या मनांत दबून बसलेल्या शंका-कुशंकांना वाचा फुटली. कार्यकर्त्यांचा अनुभव विचारांत घेऊन पक्षान्तर्गत लढा लोकशाही पद्धतीनें मिटविण्याचा मार्ग, पुढारीपणाच्या कडव्या दुराग्रही वृत्तीमुळें रोखला गेला. तेव्हां अंतःस्थ लढ्याचा जाहीर परिस्फोट झाला. महाराष्ट्रांतील कांहीं नामवंत कम्युनिस्ट कार्यकर्ते पक्षाचा राजीनामा देऊन बाहेर पडले. त्यांपैकीं कॉ. फडके-बेडेकरप्रभृतींनीं एकांगी साहसवादी धोरणाविरुद्ध आपलें म्हणणें निवेदन-रूपानें प्रसिद्ध केलें. पक्षान्तर्गत व्यवहारांत लोकशाही नाममात्रसुद्धां उतरत नसल्याकारणानें, पक्ष-निष्ठेला जबर धक्का बसला. एका बाजूनें कॉंग्रेस सरकारनें कम्युनिस्ट पंथीयांविरुद्ध उगारलेलें हत्यार आणि दुसऱ्या बाजूनें दिवसेंदिवस मनोमन न पटणारें असें पक्षपुढारीपणाकडून लादण्यांत येणारें धोरण या कात्रींत सांपडून पक्षाची सर्वत्र वाताहत झाली. प्रत्येक कार्यकर्त्याला पक्षाचा आधार तुटून ' राजकीय पोरकेपण ' प्राप्त झाल्याचें अनुभवास येऊं लागलें. जनतेमध्यें संघटनात्मक व्यापक व खोल पाया नाहीं, पक्षपुढारीपणाची नोकरशाही हुकुमत झुगारण्याचें आत्मिक बल नाहीं, कामगारसंघटना फाटाफुटीनें खिळखिळित झालेल्या, किसानसंघटना केवळ कागदावरच जिवंत, अशा भयानक परिस्थिती-च्या भोंवऱ्यांत कम्युनिस्ट पक्ष सांपडला व त्यांतून त्याला बाहेर निघणें दुष्कर होऊन बसलें. बऱ्याच कालावधीनंतर आतां पक्ष सावरण्याच्या उद्देशानें कार्यक्रमाचा मसुदा व धोरणविषयक निवेदन प्रसिद्ध करून पक्षपुढाऱ्यांनीं नव्या राज-कारणाचें सूत उवाच केलें आहे, ही गोष्ट निःसंशय स्वागतार्ह आहे. परंतु अधिकृतपणें जाहीर झालेलें धोरण, कार्यक्रम व त्यांवर प्रकाश टाकणारी पुस्तिका ह्या गोष्टी नजरेखालून घालतां पक्षाच्या नव्या राजकीय बैठकीला अद्यापपावेतों स्थिरपणा अगर कायमपणा आला आहे असें दिसत नाहीं.

भारतीय कम्युनिस्ट पक्षाची सध्यां वाताहत झाली आहे, याचा अर्थ कम्युनिस्ट चळवळ नेस्त-नाबूत झाली आहे असा नव्हे. कम्युनिस्ट पक्षाच्या राजकारणाची ओळखसुद्धां नसलेली, त्या पक्षाचें राजकारण काय ' गौड-बंगाल ' आहे असें म्हणणारी मंडळीसुद्धां ' या देशांत कम्युनिझम येणार ' असे उद्गार काढतात. याचा त्यांना खोल अर्थ कळतो, अशांतला भाग नाहीं. तरी पण विद्यमान भांडवली अर्थव्यवस्थेबद्दलचा उद्वेग व चीड त्या उद्गारांतून व्यक्त होत असतात, हें नाकारतां येणार नाहीं. कम्युनिस्ट मतप्रणालीच्या जागतिक प्रभावा-पासून हिंदुस्थान अलिप्त राहाणें सध्यांच्या जगांत कसें शक्य आहे ?

कम्युनिस्ट चळवळीचें व त्याचप्रमाणें कम्युनिस्ट पक्षाचें राजकारण नीट समजावून घेणें व आपल्या समजुतीनुसार त्याला इष्ट वळण लावणें हें मार्क्सवादी विचाराच्या लोकांचें क्रान्तिकारक कर्तव्य ठरतें. गेल्या








वर्ष-दीड वर्षांमध्यें पक्षान्तर्गत असा जो वैचारिक व संघटनात्मक लढा झाला, त्यामुळें आंधळ्या, कडव्या निष्ठेच्या जागीं आतां डोळस जाणीव सर्वसामान्य कार्यकर्त्यांमध्यें‌मुद्धां निर्माण झालेली दिसते. त्यायोगें पक्षाचे कार्यकर्ते मित्रत्वाच्या नात्यानें इतर मार्क्सवादी विचारांच्या लोकांकडून होणाऱ्या पक्षधोरणासंबंधींच्या टीकेंतील मर्म ग्रहण करतील, अशी आशा करावयास जागा आहे.

## युद्धोत्तर युरोपांत पडलेले दोन गट

दुसऱ्या महायुद्धांतून बाहेर पडल्यानंतर कम्युनिस्ट चळवळ कोणत्या दिशेनें व धोरणानें पुढील पावलें टाकणार, हा प्रश्न मार्क्सवादी विचारवंतांपुढें उभा होता. हिट्लरचा राक्षसी हल्ला परतवण्यासाठीं सोव्हिएट राशिया सर्व सामर्थ्य पणाला लावून रणांगणांत उतरल्यानंतर महायुद्धाचा रंग पालटला आणि पश्चिम यूरोपांतील कम्युनिस्ट पक्ष नाझी हुकमतीविरुद्ध उठाव करण्यासाठीं प्रतिकारदलांत सामील झाले. या प्रतिकारदलांची ताकद त्यामुळें निःसंशय वाढली, यांत शंका नाहीं. राष्ट्रवादी प्रतिकारक आणि कम्युनिस्ट या दोघांची एकसंध फळी निर्माण झाल्याकारणानें नाझी हुकमतीविरुद्ध झुंजतांना कम्युनिस्ट पक्षीयांची वर्गीय निष्ठा एका व्यापक राष्ट्रीय प्रतिकारवादी भूमिकेंत विलीन झाली. हिट्लरचा पाडाव हेंच एक उद्दिष्ट जोंवर डोळ्यांपुढें होतें तोंवर प्रतिकारकांच्या आघाडींत कम्युनिस्ट पंथीयांचा मिलाफ झाल्यामुळें लष्करी विजय दृष्टिपथांत येण्याला मोठी मदत झाली ही गोष्ट कोणी नाकारूं शकणार नाहीं. परंतु जर्मन सैनिकांचा पाडाव करीत लाल सेना पूर्व यूरोपांत घुसल्यापासून या घटनेचें युरोपच्या पुढील राजकारणावर, किंबहुना एकंदर जगाच्या राजकारणावर, केवढे दूरगामी परिणाम होतील, याचीं स्वप्नें चर्चिलसारख्या साम्राज्यवादी मुत्सद्यांना भेडसावूं लागलीं. युद्धाच्या अखेरच्या अवस्थेंत लष्करी डावपेंच आणि व्यूहरचना करतांना, त्यांची आंखणी पूर्व यूरोपावर रशियाचें स्वामित्व प्रस्थापित होणार नाहीं, अशा धोरणानें व्हावी, असें चर्चिलप्रभृतींनीं योजिलें. परंतु त्या काळीं लष्करी विजयावर सर्व लक्ष केंद्रित झालें असल्यानें, राजकीय परिणामावर नजर ठेवून लष्करी डावपेंच आंखण्याची चर्चिलची योजना कोणालाहि रुचणारी नव्हती. किंबहुना, चर्चिलच्या पातळीवरील मुत्सद्दी दृष्टीला ज्या घटना भेडसावीत होत्या त्यांचें अमेरिकनांना आकलनहि झालेलें नसावें ! आपल्या अफाट सामर्थ्याच्या आत्मविश्वासानें हिट्लरशाहीला धुळीला मिळविण्यासाठीं सिद्ध झालेल्या अमेरिकनांचें राजकीय नेतृत्व या विशिष्ट कालखंडांत चर्चिलसारख्या मुरब्बी मुत्सद्याकडे यावें हें साहजिक होतें. त्याचा परिणाम म्हणून युद्धाच्या अखेरच्या अवस्थेंत दोस्तांच्या छावणींत अंतःस्थ संघर्ष सुरू झालेला होता. त्याचा जाहीर स्फोट, युद्ध निकरावर आलें असतां, होणें दोस्तराष्ट्रांना घातक ठरण्याचा धोका असल्यानें, त्यावेळीं तो झाला नाहीं. मात्र युद्धाचा शेवट होतांच दोस्त म्हणून लढणाऱ्या राष्ट्रांमध्यें दोन तट स्पष्टपणें दिसूं लागले. अँग्लो-अमेरिकनांनीं स्वतःला सावरून आपले पवित्रे बदलण्यास सुरुवात केली. त्याची प्रतिक्रिया रशियाच्या धोरणांत उमटणें साहजिक होतें. असें असलें तरी, कम्युनिस्ट चळवळींत त्याची प्रतिक्रिया काय होते हें नजरेला येण्याला कांहीं कालावधि लागला. कारण, प्रतिकारदलांतून लढलेले कम्युनिस्ट पक्ष युद्ध संपल्यानंतर पूर्वीच्याच खेळीमेळीच्या भावनेनें इतर पक्षीयांशीं सहकार्यानें वागत होते. इटली, फ्रान्स इत्यादि देशांत कम्युनिस्ट पक्षाचें बळ त्यामुळें वाढलेलें होतें. युद्धोत्तर नवीन सरकारें अस्तित्वांत आलीं, त्यांमध्यें कम्युनिस्टांचे प्रतिनिधी सामील झालेले होते. संयुक्त मंत्रिमंडळांच्या हातीं कारभार येऊन युद्धानें उद्ध्वस्त झालेल्या देशांत फिरून घडी बसविण्याचा उपक्रम सुरू झाला होता. बाहेरच्या मदतीवांचून अशी घडी बसविणें शक्य नव्हतें. संयुक्त मंत्रिमंडळांत बसून कम्युनिस्टांना आपलें बळ संघटित करून वाढविण्याला अवसर दिला, तर भांडवली अर्थव्यवस्था पुनरपि प्रस्थापित करण्याच्या प्रयत्नाला खो बसणार, या भीतीनें त्यांच्या प्रतिनिधींना बाहेर हुसकण्याचे डावपेंच सुरू झाले. भांडवली अर्थव्यवस्थेची डागडुजी करण्यासाठीं अमेरिकेनें मार्शल-योजना पुढें ठेवली. अशा रीतीनें जुन्या भांडवली अर्थव्यवस्थेला







उचलून धरणाऱ्या पश्चिम यूरोपमधल्या राजकीय पक्षांनीं अमेरिकेच्या अर्थव्यवस्थेचें जूं पत्करलें. तेव्हां युद्धांतून तावूनसुलाखून निघालेल्या समाजाला जुन्या भांडवली चौकटींत बसविण्याचा प्रयत्न सुरू झाला आणि त्यायोगें कम्युनिस्ट पक्षांना युद्धोत्तर काळांतील आपल्या राजकीय बैठकीचा फेरविचार करणें क्रमप्राप्त ठरलें. युद्धाच्या अखेरच्या अवस्थेंत सुरू झालेल्या संघर्षांचा शेवट यूरोपांत दोन तट पडण्यांत झाला.

## झानौचा प्रबंध व हिंदी कम्युनिस्टांचें धोरण

आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळीचें मार्गदर्शन करणाऱ्या 'कॉमिंटर्न' या संस्थेचें युद्धकाळांत विसर्जन करण्यात आलें होतें. आतां अमेरिकेच्या नेतृत्वाखालीं सुरू झालेल्या आक्रमणाला प्रतिरोध करण्यासाठीं कम्युनिस्ट चळवळीचें मार्गदर्शक केंद्र फिरून निर्माण होणें अपरिहार्यच होतें. त्यांतूनच 'कॉमिनफार्म' या कम्युनिस्ट चळवळीचें मार्गदर्शन करणाऱ्या नव्या केंद्राचा जन्म झाला. 'कॉमिनफॉर्म' स्थापन करण्याकरितां नऊ देशांतील कम्युनिस्ट प्रतिनिधींची पहिली परिषद् १९४७ च्या सप्टेंबर अखेर भरली. त्या परिषदेपुढें सोव्हिएट युनियनच्या कम्युनिस्ट पक्षाचे चिटणीस कॉ. झानौ (Zhdanov) यांनीं आंतरराष्ट्रीय परिस्थितीसंबंधींचा आपला सुप्रसिद्ध प्रबंध मांडला. तेव्हांपासून साहजिकच या प्रबंधांत केलेल्या मांडणीनुसार जगांतील कम्युनिस्ट चळवळींनीं आपलीं धोरणें तपासून तीं फिरून आखण्यास प्रारंभ केला.

कॉ. झानौच्या प्रबंधामध्यें, युद्धोत्तर कालांत जगांतील राजकीय शक्तींची दोन गटांत कशी विभागणी झाली आहे, त्यांतून साम्राज्यशाही शक्तींचा एक गट आणि साम्राज्यविरोधी अशा लोकशाहीवादी शक्तींचा दुसरा गट असे दोन गट कसे निर्माण होत आहेत, व त्याचे परिणाम काय होणार आहेत, याचें मूलग्राही विवेचन करण्यांत आलें आहे. कॉ. झानौनें मुख्यतः यूरोपांतील परिस्थितीच डोळ्यांपुढें ठेवून आपले निष्कर्ष काढले आहेत, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. हिंदुस्थानांत कम्युनिस्ट चळवळ युद्धकालांत राष्ट्रीय आघाडींत सामील झालेली नव्हती; इतकेंच काय, परंतु राष्ट्रीय स्वातंत्र्याचा लढा निकरावर आला असतां या ठिकाणच्या कम्युनिस्ट चळवळीनें परकीय साम्राज्यसरकारशीं हातमिळवणी केलेली होती. त्यामुळें ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं देशाची फाळणी करून कॉंग्रेस पक्षाच्या हातीं सत्ता दिली त्या वेळीं, राष्ट्रवाद्यांच्या खांद्याला खांदा लावून हिट्लरशाहीविरुद्ध लढलेल्या यूरोपांतील कम्युनिस्ट पक्षाप्रमाणें भारतांतील कम्युनिस्ट पक्षाला राजकीय सत्तेंत भागीदारी किंवा जनतेचें नेतृत्व करण्यांत पुढाकार घेण्यासारखी परिस्थिति येथें बिलकूल नव्हती. युद्धकालांत कम्युनिस्ट पक्ष संघटनात्मक दृष्ट्या देशांत अधिक बलवान् झाल्यासारखा दिसत असला, तरी कामगार आणि शेतकरी विभागांत त्याचें राजकीय वजन निश्चितपणें कमी झालें होतें. राष्ट्रीय भावनेनें उद्दीपित झालेली सर्वसामान्य जनता, हा पक्ष साम्राज्यसत्तेचा हस्तक बनला, ही घटना विसरूं शकली नाहीं. ब्रिटिश-साम्राज्यवादी सत्तात्याग करून गेले हा राष्ट्रवादी भावनेला आपल्या प्रतिकारशक्तीचा विजय आहे असें वाटणें साहजिक होतें. त्या वेळीं दिसलेला जनतेंतील अपूर्व उत्साह त्याचीच साथ करीत होता. कॉंग्रेसनेतृत्वाची प्रतिष्ठा अमाप वाढली होती. भावनात्मक वातावरणांत या राजकीय घडामोडींचा शान्तपणें विचार करणें अशक्यप्राय होतें. युद्धसमाप्तीनंतर जसजसा जास्त काळ लोटत चालला तसे तसे आंतरराष्ट्रीय राजकारणांतील दोन मूलभूत प्रवाह यूरोपांत अधिकाधिक स्पष्ट दिसूं लागले. हिंदुस्थानांतहि नवीन लाभलेल्या स्वातंत्र्यासंबंधीं बाळगलेल्या अपेक्षांचा चक्काचूर होऊन सामान्य जनतेच्या डोळ्यांवरील भावनेचें पटल दूर होण्याला कांहीं काल लोटणें अगत्याचें होतें.

अशा स्थितींत यूरोपचें चित्र डोळ्यापुढें ठेवून कॉ. झानौनें जी मांडणी केली त्याबरहुकूम हिंदी परिस्थितीची कृत्रिमपणानें मांडणी करणें मार्क्सवादी दृष्ट्या संपूर्णपणें अशास्त्रीय होतें. तत्त्वज्ञानाची व्यवहाराशीं सांगड घालतांना गटेच्या "Theory, my friend, is grey, but green is the everlasting tree of life" या सुप्रसिद्ध वचनाचा लेनिन नेहमीं निर्देश करीत असे.












# कम्युनिस्ट पक्षाचें नवें राजकारण

त्यांतील मर्म कम्युनिस्ट पंथियांना नीट आकलन न झाल्याकारणानें त्यांचा मार्क्सवादाचा व्यवहार यांत्रिकपणें होत आला आहे. कलकत्ता प्रबंध याला अपवाद कसा ठरेल? आशियांतील वसाहतवजा परतंत्र अशा देशांमधील जनतेवर दुसऱ्या महायुद्धाचे काय परिणाम झाले आहेत, येथील राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीचे व क्रांतिकारक कम्युनिस्ट चळवळीचे संबंध काय आहेत व परस्पर बलाबल किती आहे याची वस्तुनिष्ठ दृष्टीनें पाहणी करणें आवश्यक होतें. पण तें न करतां, युरोपांतील अनुभवांवर आधारलेल्या सिद्धान्तानुसार नवी दिशा कम्युनिस्ट चळवळीला लावण्याचा जो प्रयत्न तिकडे सुरू झाला त्याचें आंधळें अनुकरण हिंदी कम्युनिस्ट पक्षाकडून केलें गेलें. कॉ. झानौच्या प्रबंधांतील मूलभूत सिद्धान्तानुसार परंतु हिंदी परिस्थिति डोळ्यांपुढें ठेवून आणि सत्तान्तरानें झालेला क्रांतिकारक बदल विचारांत घेऊन येथील कम्युनिस्ट पक्षानें आपलें धोरण धीमेपणानें आंखलें असतें, तर कलकत्ता येथें मंजूर केलेला राजकीय प्रबंध आणि तदनुसार येथील कम्युनिस्ट चळवळीनें आंखलेलें धोरण यांना निश्चितपणें वेगळें वळण मिळालें असतें. कॉंग्रेस पक्षाच्या हातीं देशाची राजकीय सत्ता आली यामुळें वास्तविक येथील परिस्थितींत कोणता बदल झाला, त्याचे परिणाम भिन्न भिन्न वर्गांवर कसकसे होणार याचें योग्य मापन कम्युनिस्ट पक्षानें करून कलकत्ता प्रबंधाची राजकीय बैठक निश्चित केली असती तर ती वेगळी झाली असती.

## कलकत्त्याच्या प्रबंधांतील भूमिका

मौंटबॅटन-योजनेनुसार देशाची विभागणी होऊन पाकिस्तान आणि हिंदुस्थान अशीं दोन स्वतंत्र सरकारें स्थापन झाल्यावर, कम्युनिस्ट पक्षाचे नेते कॉ. पी. सी. जोशी यांनीं हिंदी स्वातंत्र्य ही एक सत्य वस्तु आहे अशा समजुतीनें त्या घटनेचें सहर्ष स्वागत केलें आणि हिंदी समाजक्रांतीचा पुढील कार्यक्रम त्याच्या अनुरोधानें आंखून कम्युनिस्ट पक्षाला तो पार पाडणें शक्य आहे, अशी भूमिका घेतली. परंतु १९४७ च्या डिसेंबरमध्यें "भारताला मिळालेलें स्वातंत्र्य हें खरें स्वातंत्र्य नसून नकली स्वातंत्र्य आहे, या (मौंटबॅटन) निवाड्यानें देशाची जातीय भूमिकेवरून फाळणी करण्यांत आली असून ब्रिटिश साम्राज्यशाहीनें आपल्या हुकुमतीखालीं राज्यसत्तेंत भांडवलदारवर्गाला हिस्सा दिला आहे" असें मत पक्षाच्या धोरणविषयक निवेदनांत व्यक्त करण्यांत आलें. १९४८ च्या प्रारंभीं सत्तान्तरानंतर कांहीं महिन्यांनींच हिन्दी कम्युनिस्ट पक्षाची दुसरी कॉंग्रेस कलकत्ता येथें भरली. त्या कॉंग्रेसमध्यें पक्षानें नवा राजकीय प्रबंध मंजूर केला. त्या प्रबंधामध्यें ब्रिटिशांनीं वस्तुतः सत्तात्याग केला नसून वरकरणी भारतांतील आपल्या हुकमतीचें बाह्य स्वरूप केवळ बदललें आहे अशी भूमिका ठामपणें मांडली. 'युद्धोत्तर जगांतील वासाहतिक प्रश्न आणि आजचा हिंदुस्थान' या आपल्या प्रबंधांत कॉ. झुकाव्ह यानें हिंदुस्थानांतील बड्या भांडवलदारांनीं जनतेच्या क्रांतिकारक उठावाला बिचकून युद्धांत खिळखिळ्या झालेल्या ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं तडजोड करून सत्तेंत भागीदारी मिळविली, असें सत्तान्तराबद्दल निदान केलें आहे. याच निदानाच्या आधारें परंतु त्यांत एक बदल करून हिन्दी कम्युनिस्ट पक्षानें सर्व भांडवलदारवर्गानें ब्रिटिश साम्राज्यवाद्यांशीं तडजोड करून सत्तेंत वांटा मिळविला असें मत आपल्या कलकत्ता-प्रबंधांत मांडलें आणि या सिद्धान्तानुसार ब्रिटिश साम्राज्यशाहीशीं हातमिळवणी करून मिळविलेल्या सत्तेच्या सिंहासनावर बसलेलें नेहरू-सरकार, हें साम्राज्यशाहीच्या हातांतील एक निर्जीव बाहुलें (Puppet) आहे असा दावा केला.

कलकत्ता-प्रबंधांत ग्रंथित केलेलें मत हें वस्तुस्थितीचें योग्य मूल्यमापन करून मांडण्यांत आलें आहे असें म्हणतां येत नाहीं. कारण ब्रिटिश साम्राज्यवादी राज्यकर्त्यांना हिंदुस्थानांत थोडासुद्धां सामाजिक आधार राहिलेला नव्हता आणि ब्रिटिश साम्राज्यशाही युद्धांत खिळखिळी झाली होती. तुलनेनें राष्ट्रीय चळवळीचें पुढारीपण करणाऱ्या भांडवलदारवर्गाच्या समाजांतील आर्थिक व राजकीय स्थानाला अधिक बळकटी आली होती. तेव्हां ब्रिटिश भांडवलशाही कमकुवत झालेली आणि हिन्दी भांडवली पुढारीपणाचा आत्मविश्वास वाढलेला,








या गोष्टीची दखल घेतल्यास साम्राज्यशाहीपुढें शरणागति पत्करून भांडवलदारवर्गानें सत्तेंत भागिदारी मिळविली, हें म्हणणें वस्तुस्थितीला धरून नाहीं. शिवाय, राष्ट्रीय चळवळीमध्यें कामगारवर्गाचें पुढारीपण क्रांतिकारक मार्गानें सत्ता हस्तगत करण्याइतकें संघटित व लढाऊ नव्हतें, ही गोष्ट केव्हांहि दृष्टीआड करून चालणार नाहीं. त्याचप्रमाणें ब्रिटिश साम्राज्यशाहीनें केलेल्या सत्तान्तरानंतर येथील भांडवली पुढारीपणाच्या हातीं सत्ता येणें ही एक स्वाभाविक प्रक्रिया होती. हिन्दी स्वातंत्र्याच्या चळवळीवर भांडवली पुढारीपणाची छाप सातत्यानें होती आणि नेमक्या मोक्याच्या वेळीं क्रांतिकारक लढाऊ पुढारीपण राष्ट्रीय चळवळीपासून, तसेंच जनतेपासून अलग पडलें होतें. अशा अवस्थेंत सत्तासंक्रमणानंतर हिन्दी बड्या भांडवलदारांच्या हातीं सत्ता जाणें अपरिहार्यच ठरत नाहीं काय?

पक्षाच्या ताज्या धोरणविषयक निवेदनांत व कार्यक्रमांत घेण्यांत आलेली यासंबंधींची भूमिका निसरडी आहे. नेहरू सरकारचें वर्गीय स्वरूप त्यामध्यें निःसंदिग्धपणें मांडलेलें नाहीं. त्यामुळें परस्परविरोधी अशीं विधानें करण्यांत आलीं आहेत. नव्या मांडणींतील गल्लत तपशीलवार तपासणें प्रस्तुत लेखाच्या मर्यादेंत बसणार नाहीं. परंतु कार्यक्रमाच्या संदर्भांत त्याचा अर्थ लावला, तर 'या सरकारच्या कारभारामुळें उद्योगपति व कारखानदार भरडून निघाले आहेत, तेव्हां त्यांच्या संरक्षणासाठीं जकातीच्या भिंती आपण तात्काळ उभारल्या पाहिजेत' असा निष्कर्ष निघतो. 'परदेशी भांडवलदारांनीं हिन्दी बाजारपेठा आपल्या मालानें भरून टाकल्या आहेत व त्यामुळें देशी उद्योगधंद्यांची गळचेपी होत आहे', अशी मांडणी कार्यक्रममसुद्यांत करण्यांत आली आहे. 'कॉमिनफार्म'च्या मुखपत्रांत २७ जानेवारी १९५० च्या लेखांत हिन्दी स्वातंत्र्याचें 'नकली स्वातंत्र्य' अगर 'औपचारिक स्वातंत्र्य' असें वर्णन केलें आहे. पण, त्याचा अर्थ वस्तुस्थितीच्या अनुरोधानें न लावतां हिन्दी कम्युनिस्टपक्ष तो अक्षरशः घेत आहे असें म्हणणें, नवा धोरणविषयक मसुदा व कार्यक्रम पाहिल्यावर बरोबर ठरेल.

## देशाच्या परिस्थितीचें निदान

माझ्या मतें नेहरू सरकारचें वस्तुनिष्ठ स्वरूप मांडावयाचें झाल्यास, घटनात्मक दृष्ट्या तें पूर्ण स्वतंत्र व सार्वभौम आहे; पण आर्थिक दृष्ट्या मात्र तें दुबळें व साम्राज्यशाही देशांच्या अर्थकारणावर अवलंबून आहे, असेंच त्याच्या स्वरूपाचें वर्णन करणें रास्त होईल. युद्धोत्तर भांडवलदारी जगाच्या परिस्थितीचा आढावा घेतांना अमेरिका ही जगत्स्वामिनी बनली असून ब्रिटन, फ्रान्स वगैरे देश तिचे मांडलिक या दर्जाला पोंचले आहेत, असें कॉ. झानौनें आपल्या प्रबंधांत सूचित केलें आहे. त्याच आधारें हिंदुस्थानच्या परावलंबित्वाचा अर्थ लावणें सयुक्तिक ठरेल. ब्रिटन हिन्दवर ज्या वेळीं प्रत्यक्ष हुकुमत गाजवीत होतें त्या वेळीं या देशांत परकीय भांडवलदारांचें राजकीय व आर्थिक असें दुहेरी वर्चस्व असल्यानें तो एक वसाहत देश होता; परंतु आतां परकीयांची राजकीय सत्ता नष्ट झाल्यानंतर परक्यांच्या आर्थिक वर्चस्वामुळें व हिंदी भांडवलदारीच्या विशिष्ट विकासामुळें तो निमवसाहत अशा अवस्थेंत गेला आहे, हा महत्त्वाचा बदल दृष्टीआड करतां येण्यासारखा नाहीं. म्हणून विकासक्रमांत सत्तान्तरानंतर हिन्दनें पुढील एक टप्पा गांठला याची नोंद करणें अगत्याचें आहे.

देशाच्या परिस्थितीचें अचूक निदान केल्यावांचून समाजक्रांतीच्या कोठल्या अवस्थेंत आज तो आहे हें ठरवितां येत नाहीं. पक्षाचा नवा कार्यक्रम-मसुदा व धोरणविषयक निवेदन यांमध्यें चांचरत चांचरत केलेली मांडणी पाहतां पक्षानें क्रांतीच्या अवस्थेबद्दल स्पष्ट कल्पना पुढें ठेविली आहे असें म्हणवत नाहीं. कलकत्ता-प्रबंधानंतर लोकशाही क्रान्तीबरोबरच समाजसत्तावादी क्रान्तिहि घडवून आणण्याच्या दृष्टीनें कार्यक्रम व लढापद्धति यांची आंखणी केली पाहिजे, असें त्या वेळचे पक्षनेते कॉ. बी. टी. रणदिवे यांनीं क्रांतीच्या अवस्थेबद्दलचें स्वरूप मांडतांना म्हटलें होतें. मार्क्सवादी विचारांत, 'भांडवलदारी लोकशाही क्रान्ति ही पुरी झाल्यानंतरच समाजसत्तावादी क्रांतीचा कार्यक्रम हातीं घेतला पाहिजे' असा क्रांतिशास्त्राचा नियम म्हणून सांगितला जातो. रशिया-



अनुक्रमणिका






मध्यें एका विशिष्ट परिस्थितींत आणि लेनिन-सारख्या पुढाऱ्याच्या प्रतिभाशाली नेतृत्वाखालीं पहिल्या टप्प्यावरून तात्काल दुसरा टप्पा गांठला गेला. तोच दाखला पुढें ठेवून कृत्रिमपणानें त्याचें अनुकरण कोणीं केल्यास त्यांत पक्ष धोक्यांत येतोच, पण क्रान्तिकारक शक्तीहि खची होतात. कलकत्ता-प्रबंधाचा स्वीकार केल्यापासून गेलीं तीन वर्षें हिन्दी कम्युनिस्ट चळवळीला जें एकांगी व साहसवादी वळण लागलें, त्याचें बीज दुहेरी क्रान्तीच्या या चुकीच्या व्यवहारांत आहे.

हिंदुस्थानांतील भांडवलदारी लोकशाही क्रान्ति सत्तान्तरामुळें पूर्ण झाली नसून, हिंदी कम्युनिस्ट पक्षानें ती पूर्ण करण्याच्या दृष्टीनें तातडतोबीचा कार्यक्रम म्हणून हा नवा मसुदा पुढें ठेवला आहे, असें म्हणणें सयुक्तिक ठरेल. ब्रिटिश साम्राज्यशाही व सरंजामदार या दोघांच्या भागीदारींत या देशावर हुकुमत चालविली जाते. त्यामुळें हिंदी 'राष्ट्रीय' भांडवलदारवर्ग साम्राज्यशाहीच्या जात्यांत भरडला जात आहे. तेव्हां त्या 'राष्ट्रीय' भांडवलदारांच्या संरक्षणासाठीं हिंदी जनतेनें फिरून 'स्वदेशी'ची चळवळ हातीं घेतली पाहिजे, हा नव्या कार्यक्रमाचा गाभा आहे. महत्त्वाच्या धंद्यांचें राष्ट्रीयीकरण तातडतोब करावें असें कम्युनिस्ट पक्ष आपल्या कार्य-क्रमांत कोठेंच मांडीत नाहीं याचें इंगितहि त्यांत सांपडेल. अर्थात् हें सत्तान्तराचें गूढ, वस्तुनिष्ठ दृष्टीनें उकलून कार्यक्रमाची मांडणी केली गेली असती तर, जनतेच्या अनुभवाशीं विसंगत अशी ही हास्यास्पद भूमिका कम्युनिस्ट पक्षाकडून घेतली गेली नसती. हिंदी कम्युनिस्ट-चळवळीच्या अंगभूत दोषांचाच हा परिणाम आहे. एक टोक सुटलें कीं दुसरें टोक ती चळवळ गांठते ! या एकांगीपणाच्या विकृतींतून कम्युनिस्ट-चळवळ अजूनहि मुक्त झालेली नाहीं, याची साक्ष नवें धोरण पाहतां पटते.

## चुकीचा 'तेलंगण-मार्ग'

कलकत्याला कम्युनिस्ट पक्षानें जी राजकीय बैठक घेतली तींतूनच नव्या लढ्याच्या पद्धतीचा अवलंब केला गेला व त्याची वाढहि झाली. चीनमधील कम्युनिस्ट पक्षाच्या विजयानंतर चीनचा मार्ग हिन्दी कम्युनिस्ट पक्षानें डोळ्यांपुढें ठेवला. परंतु चीनमध्यें विशिष्ट परिस्थितींत सशस्त्र लढ्याची एक परंपरा निर्माण झाली होती. त्याच्याशीं हिन्दी परिस्थितीचे साम्य व विरोध कोणत्या बाबतींत आहे, याची तप-शीलवार पाहणी करण्याची तारतम्यबुद्धि पक्षानें दाख-विली नाहीं. 'तेलंगण-मार्ग' या नांवानें नवीन अव-स्थेंत लढ्याच्या पद्धतीचा आदर्श म्हणून तो कम्युनिस्ट-चळवळीपुढें ठेवण्यांत आला. या लढापद्धतीच्या बाबतींत आपली चूक झाल्याची जाणीव पक्षाच्या ताज्या निवेदनांत व्यक्त झाली आहे, परंतु दहशत-वादासंबंधींचा उल्लेख हा अधिक फसवा आहे. 'तेलंगण-मार्ग' म्हणून जी लढापद्धति पक्षानें पुढें ठेवली, ती कां व कशी चूक होती याचें निःसंदिग्ध विवेचन करण्याचें पक्षानें टाळणें हें अक्षम्य आहे. 'किसानांचा जमिनीसाठीं लढा' इतक्याच मर्यादेंत तेलंगणांतील लढा चालविला असता तर त्यावर आक्षेप घेण्याला जागा उरली नसती. परंतु ही मर्यादा उल्लंघून त्याला व्यापक राजकीय लढ्याचा आदर्श बनविणें कसें समर्थनीय आहे याचें स्पष्टीकरण भाई डांगे यांनीं जरूर केलें पाहिजे.

भाई डांगे व आचार्य विनोबा भावे यांच्यांत तेलंगणांतील लढ्यासंबंधींचा झालेला पत्रव्यवहार पाहतां, पोलीसकारवाईनंतर लढा पुढें रेटत कां नेला याचा स्पष्ट खुलासा करण्याचें भाई डांगे यांनीं टाळलें आहे; कम्युनिस्ट नेत्यांनीं आत्मटीकेचा प्रांजलपणा दाखविला तर, जनतेंतील गैरसमज दूर करण्याला व पक्ष सावरण्याला त्याची मदत होईल, हें त्यांनीं अवश्य ध्यानीं घ्यावें. तेलंगणांतील जमीनदारीचा प्रश्न तातडीनें सोडविला पाहिजे, त्यासाठीं मतपरिवर्तनाबरोबर सरकारी कायद्याचा उपयोग जरूर केला पाहिजे हें आचार्य विनोबांनीं इतक्या निःसंदिग्ध शब्दांत सांगितलें आणि तें सांगतांना गांधीवादी मार्गाच्या मर्यादा झांकून ठेवल्या नाहींत, याची दखल कम्युनिस्ट पक्षानें घेतल्यास, त्याला त्यापासून पुष्कळच बोध-घेतां येईल. कोणतीहि लढापद्धति अंगीकारतांना त्या पद्धतीच्या अंमलबजावणींत जनता सहभागी झाली पाहिजे हें तत्त्व डावलून तिचा अवलंब करणें हाच साहसवाद. क्रान्तिकारक पुढारीपणानें अशा








अनुक्रमणिका

साहसवादाच्या आहारीं जाऊन सशस्त्र लढा चालू ठेवणें योग्य कीं अयोग्य याचा विचार करतांना, हिंसा-अहिंसावादाची गल्लत करून स्वतःची फसवणूक करून घेणें धोक्याचें आहे. 'तेलंगण-मार्गा'चा अवलंब करून कम्युनिस्ट पक्षानें जनतेच्या न्याय्य उठावांना दडपण्यासाठीं काँग्रेस सरकारचे हात बळकट केले, इतकेंच नव्हे तर, या दडपशाहीला एकंदर देशांतील जनतेकडून मूक सहानुभूति दाखविली गेली, याची दखल घेणें जरूर आहे.

१९४९ सालच्या अखेरीला हिन्दी परिस्थिति आणि कम्युनिस्ट पक्षाचें धोरण यासंबंधीं ब्रिटनमधील एका थोर कम्युनिस्ट नेत्याशीं बोलण्याचा योग आला होता. त्या वेळीं त्यानें नव्या धोरणाला जनतेकडून किती साथ मिळते यासंबंधीं पुढील उद्‌गार काढले : "कम्युनिस्ट पक्षाचे कार्यकर्ते तुरुंगांत तीन-तीन आठवडे उपोषण करतात, आणि तरीसुद्धां त्यांच्या मागण्यांना पाठिंबा देण्यासाठीं मुंबईच्या कामगारांकडून कांहीं निदर्शक हालचालसुद्धां होत नाहीं, हें पाहिल्यावर गेलीं वीस वर्षें ज्या कामगारक्षेत्रांत कम्युनिस्ट पक्षानें काम केलें त्या विभागांत पक्षाला किती पाठिंबा आहे, हे अजमावतां येतें." या उद्‌गारांतील सत्य ध्यानांत घेऊन पक्षानें नव्या दिशेनें धोरण आंखणें वास्तवतेला धरून होईल. कम्युनिस्ट पक्षाला या देशांत अद्याप व्यापक पाया नाहीं व परंपराहि नाहीं. जनतेच्या मनावरील गांधीवादी विचारांची पकड ढिली होत असली तरी, त्यांचे संस्कार अद्याप निपटून निघाले नाहींत. नवें धोरण निश्चित ठरवितांना तेलंगण-मार्गाच्या, म्हणजेच एकंदर लढापद्धतीच्या बाबतींत झालेल्या चुकांचें निराकरण करून त्यासंबंधीं फेरमांडणी निःसंदिग्धपणें केली, तरच पक्षाच्या मार्गांतील अडचणी दूर होण्याची शक्यता दिसते कोणतीहि लढापद्धति असो, ती लोकशाही आधारानेंच अमलांत आली तर परिणामकारक ठरते.

## 'शांतिमय साहचर्य'

पक्षाच्या निवेदनांत नेहरू सरकारच्या परराष्ट्रीय धोरणासंबंधीं जी छाननी केली आहे तीमध्यें हें धोरण दोन गटांत हेलकावे खाणारें, अतएव संशयास्पद आहे, असा अभिप्राय व्यक्त करण्यांत आला आहे. नेहरू-सरकारचा तटस्थतेचा अगर शांततावादाचा पुरस्कार येथील भांडवलदार वर्गाच्या तात्कालिक उद्दिष्टांना पोषक आहे, हें ध्यानीं घेतल्यावांचून त्या सरकारच्या परराष्ट्रीय धोरणाची संगति लावतां येणार नाहीं. परराष्ट्रीय राजकारणांत नेहरू चांचपडत चालत असले तरी, ते नजीकच्या भविष्यकालांत अमेरिकेच्या रणगाड्याला भारताला जखडून टाकतील, असा संभव कमी दिसतो. कारण ज्या भांडवलदारांच्या पकडींत गेलेल्या काँग्रेस-सरकारचें ते पुढारीपण करतात त्या वर्गाला, प्रत्यक्ष युद्धांत भाग न घेतां दोन्ही गटांपासून शक्य तों अलिप्त राहून, युद्धाच्या संधीचा फायदा आपलें आसन बळकट करण्याकडे करून घ्यावयाचा आहे, हें दृष्टीआड करून कसें चालेल? सध्यां जागतिक राजकारणांत आर्थिक व लष्करी सत्तेची मक्तेदारी स्वतःकडे घेऊन अमेरिका युद्धाच्या दिशेनें पावलें टाकीत आहे. सोव्हिएट सत्तेच्या कक्षेतील जग वगळून उरलेल्या जगांतील जनतेलाच काय, पण भांडलदारांनाहि अमेरिकेचें आक्रमक वर्चस्व मान्य आहे असें नाहीं. किंबहुना भांडवलदारी अर्थव्यवस्था व समाजवादी अर्थव्यवस्था या जगाच्या पाठीवर एकाच वेळीं गुण्यागोविंदानें नांदूं शकतील (Peaceful Co-existence) या विचाराला नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणानें पाठिंबा मिळतो, हें कम्युनिस्ट पक्षानें जरूर समजून घ्यावें. रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाचा कल सध्यां वरील बाजूलाच आहे, हें नजरेंतून सुटूं न दिल्यास नेहरूंच्या धोरणावर अशा रीतीनें टीका करण्याला जागा नाहीं.

## जागतिक कम्युनिस्ट चळवळीचा नवा पवित्रा

हिंदी कम्युनिस्ट चळवळ ही जागतिक कम्युनिस्टचळवळीचा एक भाग आहे. त्याचप्रमाणें हिंदी परिस्थिति हा तिचा आधार आहे. या दोन्ही गोष्टी डोळ्यांपुढें ठेवून पक्षाचें ताजें धोरणविषयक निवेदन व कार्यक्रमाचा मसुदा तपासून पाहातां, त्यामध्यें कांहीं बाबतींत पूर्वीं घेतलेल्या चुकीच्या भूमिका सोडण्याची इष्ट अशी प्रवृत्ति दिसत असली, तरी येथील क्रान्तीची अवस्था व लढ्याची पद्धति या दोन बाबतींत पक्षाचें धोरण कोणत्या बैठकीवर








स्थिरावणार आहे, हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट चळवळींत कांहीं बाबतींत मौलिक बदल होत आहेत असें मात्र पाहावयास मिळतें. ‘ लोकशाही शक्तींच्या ताकदीचें कमी मापन करूं नका ’ असा यूरोपांतील कम्युनिस्ट चळवळीला झानौनें इशारा दिला होता. त्याच्या अनुषंगानें आपल्या शक्तीचें अतिमापन करून भांडवलदारजगाला आव्हान देण्यापर्यंत गेलेला कम्युनिस्ट चळवळीचा पवित्रा आतां बदलण्याचीं चिन्हें दिसत आहेत. ‘ लाल सेनेचें आम्ही स्वागत करूं ’ असें म्हणणारा इटॅलिअन कम्युनिस्ट पक्ष आतां, पोपच्या धार्मिक वर्चस्वाखालीं असलेल्या गास्पेरी-सरकारचें परराष्ट्रीय धोरण बदलावें, एवढ्याच माफक गोष्टीसाठीं संघटित होण्याचा आदेश देऊं लागला आहे ! दुसरें महायुद्ध संपल्यानंतर अमेरिकेंतील कम्युनिस्ट पक्षाचा नेता अर्ल ब्राऊडर हा, ‘ आतां स्वतंत्र कम्युनिस्ट पक्षाची गरज उरलेली नाहीं, कारण भांडवलदार जग आपोआप कोलमडून पडण्याच्या अवस्थेंत आहे, ’ अशा सुधारणावादी विचारांच्या कैचींत सांपडला होता. त्या ब्राऊडरच्या विचारसरणीला झटकन् टाकून, फिरून नव्यानें पुन: संघटित झालेला अमेरिकन कम्युनिस्ट पक्ष ‘ लोकशाही मार्गानें कायदेमंडळांमार्फत आम्ही क्रांति करूं ’ अशा घोषणा करूं लागला आहे. ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षानें ‘ समाजवादाकडे नेणारा मार्ग ’ या नांवाखालीं आपला कार्यक्रम पूर्वी मांडला होता. त्याचें ‘ समाजवादाचा ब्रिटिश मार्ग ’ असें नवें नामकरण करून त्या पक्षानें ब्रिटिश जनतेला आवाहन केलें आहे. इतकेंच नव्हे तर, ब्रिटनमध्यें कायदेमंडळामार्फत क्रान्ति घडन येण्याच्या शक्यतेविषयीं विश्वास व्यक्त केला असून, ‘ब्रिटिश साम्राज्य किंवा कॉमनवेल्थ आम्ही नष्ट करूं इच्छीत नाहीं ’ अशी ग्वाही त्याच कार्यक्रमपत्रिकेंत त्यानें दिली आहे. हे बदल विचारांत घेतां, आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट-चळवळ कोणता नवा पवित्रा घेत आहे याचा उमज पडेल. हिंदी कम्युनिस्ट पक्षाच्या नव्या कार्यक्रमाचा पुरस्कार करतांना ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षाचे थोर नेते कॉ. पाम दत्त यांनीं, ‘ रशियन मार्ग ’ अगर ‘ चीन मार्ग ’ आंधळेपणानें न चोखाळतां ‘हिन्दी मार्ग’ येथील कम्युनिस्टांनीं निश्चित करावा व तोच अनुसरावा, असें सूचक मार्गदर्शन केलें आहे. जगांतील कम्युनिस्टचळवळीची सध्यांची प्रक्रिया सुधारणावादी प्रवृत्तीची असल्याकारणानें हिन्दी कम्युनिस्ट पक्षाचें सुकाणूं त्याच दिशेनें लवकरच फिरणार, असें त्या पक्षानें आपला कार्यक्रम व धोरण मांडतांना बिचकत बिचकत केलेल्या विधानांवरून वाटतें. लंबकाचें एक टोंक सुटलें कीं तो दुसरें गांठतो. त्याप्रमाणें पूर्वींचा इतिहास पाहातां येथील पक्ष सुधारणावादाचें टोंक लवकर गांठील असें निदान केल्यास तें चूक ठरण्याचा फारसा संभव नाहीं. हिन्दी परिस्थितीशीं तादात्म्य न पावलेला हा पक्ष इतर देशांतील कम्युनिस्ट चळवळीच्या धोरणांत होत असलेले बदल विचारांत घेतांना, परिस्थितिसापेक्षत्वानें आपलें धोरण ठरवील तर, पक्षाचा रुतलेला गाडा त्याला वर काढतां येणें अवघड नाहीं. परंतु तो संपूर्णपणें सुधारणावादाच्या आहारीं गेल्यास, नव्या कार्यक्रमानुसार हिन्दी भांडवलदारसुद्धां कम्युनिस्ट पक्षाच्या व्यापक अशा राष्ट्रीय लोकशाही आघाडींत सामील झाल्याचें लोकविलक्षण दृश्य पाहावयास मिळेल. त्यायोगें माल जनतेकडून पक्षाला साथ दिली जाणार नाहीं आणि नव्या धोरणाबद्दलसुद्धां पक्षकार्यकर्त्यांमध्यें साशंकता कायमच राहील असा धोका वाटतो.

---

समतेची एक पट, एक मात्रा समाजांत यावी असें आम्ही इच्छितों, तेव्हां ती आमच्या ठिकाणीं शतपट असली पाहिजे. त्याशिवाय आमची इच्छा फलद्रूप होणार नाहीं. आमच्या शरीरांत ९८° उष्णता असते; कारण, सूर्य अनंत डिग्री उष्णता राखतो. पण उद्यां जर सूर्यनारायण ९८° उष्णता राखूं लागला, तर आमच्या शरीरांत किती उष्णता राहील याचें गणित तुम्ही करूं शकतां. तेव्हां आम्हांला समाजांत जितकें माप समानता हवी असेल, त्यापेक्षां शंभरपट अधिक माप आमच्या जीवनांत असली पाहिजे, तरच आम्हीं आमच्या विचारानें, आमच्या कृतीनें, आमच्या आशेनें, आमच्या संकल्पानें समाजांत समतेची स्थापना करूं शकूं. —आचार्य विनोबा भावे, ‘ सेवक ’, ऑगस्ट १९५१










'जुगार'चें समीक्षण : प्रा. रा. कृ. लागू

# 'एकाच्या दुःखांतून दुसऱ्याची सुखनिर्मिति अशक्य !'

सौ. मुक्ताबाई दीक्षित यांचें, 'जुगार'[1] हें नाटक त्यांनीं एक विशिष्ट हेतु मनांत धरून लिहिलें. आरंभींच्या आपल्या निवेदनांत त्यांनीं सांगितल्याप्रमाणें 'एकाच्या दुःखांतून दुसऱ्याच्या सुखनिर्मितीची अशक्यता ' हें प्रमेय त्यांना लोकांपुढें मांडायचें होतें. एरव्हीं रुक्ष अशा या प्रमेयाला मनोरंजकतेची जोड मिळावी म्हणून त्यांनीं आपल्या प्रमेयाला नाट्याचा वेष दिला. नंतर नाट्याला अनुरूप अशा कथानकाची निवड करीत असतां, त्यांना डॉ. वसन्तरावांच्या द्वितीय विवाहाचें कथानक सुचलें. प्रथम पत्नी हयात असतां तिचा कडेलोट करून, निव्वळ प्रेमाखातर दुसऱ्यांदा विवाहबद्ध होऊन संसारसुखाचा खरा अनुभव घ्यायचा डॉ. वसन्तरावांचा विचार. आपल्या पत्नीच्या असह्य दुःखाचा पाया रचून त्यावर डॉ. वसन्तराव आपल्या सुखाचा इमला उभारणार होते. वर सांगितलेलें नाट्यकर्त्रीचें मनोगत प्रेक्षकांना हमखास पटवून देणारें असें हें नाटकाचें कथानक आहे. सामान्य जनतेला ( आणि सुशिक्षितांनासुद्धां ) नाटकाचें वेड असतें. आणि त्यांतून नाटकांत जर प्रेमकथा असेल तर त्या नाटकाच्या प्रलोभनांत किती तरी पटींनीं भर पडते. लहान मुलें स्वतःशींच खेळतांना, बोलतांना, अभिनय करतांना आपल्या दृष्टीस पडलीं, म्हणजे आपल्याला त्यांच्याकडे सारखें पाहत राहावेंसें वाटतें. त्याचप्रमाणें स्वतःच्या प्रणयाच्या जगांत वावरणारीं, आपापल्याशीं गुजगोष्टी करणारीं प्रेमयुगुलें आपण रंगभूमीवर पाहिलीं कीं, त्यांच्या मधुर भाषणांची, प्रेमासक्त वागणुकीची आणि प्रेमतरल हावभावांची आपल्यावर मोहिनी पडते. ' The whole world loves a lover ' या वचनाचा आपल्याला प्रत्यय येतो. दुसऱ्या अंकांतला डॉ. वसन्तराव आणि उषा यांचा प्रवेश हें जुगार नाटकाचें मोठेंच आकर्षण होय. आणि सौ. दीक्षितांच्या नाट्यलेखनकौशल्याचा तो एक उत्तम नमुना असेंही त्याचें वर्णन करणें योग्य होईल.

आतां आपण नाटकाच्या कथानकाचा थोडा तपशील पाहूं. बाबासाहेबांची मुलगी किशोरी ही डॉ. वसन्तरावांची प्रथम पत्नी. तिच्याशीं सुखानें संसार करीत असतां डॉक्टर वसन्तरावांना उषा भेटते. आपला पितृतुल्य पालक चैतन्यदेव यांच्याबरोबर एकटीच बर्मा सोडून हिंदुस्थानांत आलेली ही निर्वासित उषा. तिच्यावर डॉक्टर वसन्तरावांचें प्रेम जडतें आणि प्रथम पत्नीच्या संसाराची होळी करून केवळ प्रेमासाठीं ते उषेबरोबर विवाह करण्याचा निश्चय करतात. डॉक्टर वसन्तरावांच्या पत्नीची छोटी बहीण बेबी, वसन्तरावांच्या या संकल्पित द्वितीय विवाहाविरुद्ध प्रचंड चळवळ करायचा चंग बांधते. आपली आई इंदिराबाई ही बाबासाहेबांची द्वितीय पत्नी, हें बेबीला माहीत नसतें. बाबासाहेब आणि इंदिराबाई मात्र स्वतःच्या द्वितीय विवाहाच्या जाणिवेनें अस्वस्थ होतात. ' आपण द्वितीय विवाहाचे वधूवर, तेव्हां डॉ. वसन्तरावांना

---

१ जुगार— ( चार अंकी स्वतंत्र सामाजिक नाटक )—सौ. मुक्ताबाई दीक्षित, एम्. ए., बी. टी., इंटरनॅशनल बुक सर्व्हिस, पुणें ४. ( १९५१ ). पानें ११०, किंमत २॥ रु.

## ‘ एकाच्या दुःखांतून दुसऱ्याची सुखनिर्मिति अशक्य ! ’

द्वितीय विवाह करूं नका असें सांगण्याचा आपल्याला काय अधिकार ’ असें त्यांना वाटतें. या अडचणीच्या प्रसंगीं इंदिराबाई आपल्या पुतण्याला श्रीकान्ताला—बोलावून आणतात. श्रीकान्त डॉ. वसन्तरावांचा मित्र. तो त्यांची भेट घेतो. तेथेंच त्याला उषेची हकीगत समजते. बाबासाहेबांनीं इंदिराबाईशीं विवाह केल्यावर त्यांची प्रथम पत्नी घर सोडून, देशत्याग करून ब्रह्मदेशांत जाऊन राहते. त्या वेळीं ती गरोदर असते. ब्रह्मदेशांत गेल्यावर तिला उशिरां झालेलें अपत्य तीच ही उषा. पंधरा-सोळा वर्षें ब्रह्मदेशांत राहून आईच्या मृत्यूनंतर उषा आपल्या पालकाबरोबर, चैतन्य-देवांबरोबर हिंदुस्थानांत परत येते. श्रीकान्ताला हें समजल्यावर उषेनें वसन्तरावांशीं विवाह करूं नये म्हणून तो तिचें मन वळविण्याचा प्रयत्न करतो. उषा हट्टाला पेटलेली असते. आपल्या आईचा छळ करणाऱ्या बाबासाहेबांवर तिला सूड उगवायचा असतो. इतक्यांत बाबासाहेब, इंदिराबाई वगैरे मंडळी उषेच्या घरीं उपस्थित होतात. बाबासाहेब उषेला धाकदपटशा द्यायचा प्रयत्न करतात. उषा बधत नाहीं हें पाहून बाबासाहेब, इंदिराबाई, बेबी, श्रीकान्त यांना घेऊन निघून जातात. पुढें इंदिराबाई एकट्याच उषेला भेटायला जातात आणि प्रथम पत्नीची जागा घेणाऱ्या द्वितीय पत्नीच्या जीवनाची करुण कहाणी तिला ऐकवतात. उषेचे डोळे उघडतात. आपल्या भावी संसाराचें भेसूर चित्र तिला दिसावयाला लागतें आणि वसन्तरावांशीं विवाह करावयाचा आग्रह ती सोडून देते.

‘जुगार’ नाटकाचें हें कथानक एक समस्याच आहे. डॉ. वसन्तराव दुसऱ्याच्या दुःखांतून स्वतः-च्या सुखनिर्मितीची अपेक्षा करतात. या समस्येचा विचार करणें याचाच अर्थ जीवनाचा गंभीर विचार करणें. नाटक लिहिण्यांत हें उद्दिष्ट आपल्या मनांत होतें असें नाट्यकर्त्रीनें आपल्या निवेदनांत स्पष्ट शब्दांत सांगितलें आहे. एकजिनसी, एकसंधी असें या कथानकाचें वर्णन करतां येईल. येथें कथा-उपकथांची भानगड नाहीं. दोन गोष्टींची दोन कथासूत्रें घेऊन त्यांचा समन्वय करावयाचा येथें प्रयत्न केलेला नाहीं. कसलीच सरमिसळ नाहीं. सरळ, एका दिशेनें जाऊन हें कथानक आपलें ध्येय गांठतें.

डॉ. वसन्तरावांचा द्वितीय विवाह हें ‘जुगार’ नाटकांतील कथानकाचें बीज. या कथानकाच्या बीजांतून नाटकांतील इतर घटनांचा आविष्कार होतो. डॉ. वसन्तरावांच्या द्वितीय विवाहाविरुद्ध रान उठविण्याचा बेबीचा निश्चय, इंदिराबाईंनीं श्रीकान्ता-ला पाठविलेलें बोलावणें, डॉ. वसन्तरावांचा आणि श्रीकान्ताचा विवाहविषयक वाद, उषेची हकीगत, बाबासाहेबांची आणि उषेची भेट, इन्दिराबाईचें आणि उषेचें संभाषण या सर्व घटनांचें डॉ. वसन्त-रावांचा द्वितीय विवाह करण्याचा निर्धार हें एकच मूळ. एखाद्या सरोवराच्या शान्त पृष्ठावर जर आपण लहानसा दगड फेंकला तर, ज्या ठिकाणीं तो दगड बुडी घेतो तेथें एका पाठीमागून एक लांबवर पसरणारीं वर्तुळें निर्माण होतात. ‘जुगार’ नाटकाच्या कथानकाचें स्वरूप असेंच आहे. डॉ. वसन्त-रावांच्या द्वितीय विवाहाच्या एका प्रसंगांतून नाटकांतील अनेकविध प्रसंगांची निर्मिति झाली आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ‘जुगार’ नाटका-चें कथानक एकसूत्री आहे.

तत्त्वप्रधान नाटकाला अशा प्रकारच्या एकसंधी, एकजिनसी, एकसूत्री कथानकाची आवश्यकता असते. कारण तत्त्वप्रतिपादन हा नाटकाचा प्रधान हेतु असल्यामुळें कथानक, स्वभावदर्शन, संवाद, वाता-वरण इत्यादि नाटकाच्या इतर अंगांना केवळ आपलेंच स्वतःचें असें स्वतंत्र अस्तित्व राहत नाहीं. नाटकां-तील प्रमेयाचे ते सर्व नोकर. धन्याचा तालमाल, राग-रंग संभाळूनच त्यांना हातपाय पसरावे लागतात. आधुनिक तत्त्वप्रधान नाटकाचें हें तंत्र डोळ्यांपुढें ठेवून, सौ. दीक्षितांनीं ‘जुगार’ नाटकांत आपल्या प्रमेयाचें साधन म्हणून नाटकाच्या कथानकाला जेवढा वाव देतां येईल तेवढाच वाव दिला. यामुळें या कथानकाला आटोपशीर आणि सुटसुटीत असें आपल्याला म्हणतां येतें.

याच्या उलट, प्रेक्षकांचें मनोरंजन करण्याकरितां लिहिलेल्या नाटकांत डोळे दिपवून टाकणारे देखावे आणि चित्त थरारून टाकणारे प्रसंग यांची रेलचेल असते. नाटकाच्या केवळ मनोरंजनाच्या ध्येयाला

सर्वस्वी पोषक अशी ही नाट्यरचना. परंतु तत्त्वप्रधान नाटकाचें प्रेक्षकांच्या विचारांना चालना द्यावयाचें ध्येय असल्यामुळें, तत्त्वप्रधान नाटक म्हणजे प्रेक्षकांच्या बुद्धीला दिलेलें आव्हान होय. नित्याच्या व्यवहारांतील एखादी सामाजिक समस्या हा नाटकाचा विषय, आणि या समस्येची चर्चा हें नाटकाचें प्रभावी तंत्र. 'जुगार' नाटकांत याच तंत्राचा अवलंब केलेला दिसून येईल. पहिल्या प्रवेशांत प्रेक्षकांना किशोरीच्या विमनस्क स्थितीची ओळख करून दिल्यानंतर इंदिराबाई आणि श्रीकान्त, श्रीकान्त आणि बेबी, श्रीकान्त आणि बाबासाहेब; तसेंच श्रीकान्त आणि डॉ. वसन्तराव, उषा आणि श्रीकान्त, बाबासाहेब आणि उषा, अखेर इंदिराबाई आणि उषा इत्यादींच्या पहिल्या प्रवेशानंतरच्या प्रवेशांत सर्वत्र द्वितीय विवाहाची चर्चा आपल्याला ऐकूं येते. आणि जेव्हां उषा आणि बाबासाहेब यांची भेट होते तेव्हां या चर्चेचा स्फोट होतो. सरसर वर जाणारा बाण जसा उंच आकाशांत गेला म्हणजे तेथें त्याचा स्फोट होतो; तसाच हा चर्चेचा स्फोट. बाबासाहेब जसे हटवादी तशीच उषा हटवादी, एक ऋण-विद्युत्, तर दुसरी धन-विद्युत्. त्यांची भेट झाल्यानंतर स्फोट झाला नाहीं तरच नवल! या स्फोटामुळें कांहीं काळ नाटकगृहांत जिकडे तिकडे स्तब्धता पसरते. आतां ही समस्या कशी सुटणार असा प्रेक्षकांना प्रश्न पडतो. तथापि, पुढच्याच प्रवेशांत इंदिराबाईंनीं उषेला आपली आत्मकथा सांगितल्यावर डॉ. वसन्तरावांशीं लग्न करण्याचा आपला हट्ट ती सोडून देते. कड्यावरून बेधडक उडी घ्यायला निघालेली उषा, कन्येच्या निर्व्याज ममतेनें इंदिराबाईंना जाऊन बिलगते! सोसाट्याचें वादळ शान्त झाल्यावर, मेघांचा गडगडाट आकाशांत विरून गेल्यावर जिकडे तिकडे सूर्याच्या कोमल किरणांचा प्रकाश पसरावा, तसाच हा 'जुगार' नाटकाचा अखेरचा प्रवेश. नाटकाचें सारसर्वस्व यांत एकवटलेलें आहे. आधींच्या खळबळ उडवून देणाऱ्या प्रवेशानंतर या अखेरच्या प्रवेशामुळें कथानकाला एकदम कलाटणी मिळते. पेंचप्रसंग कसा सुटतो याचें प्रेक्षकांना पडलेलें कोडें तात्काळ उलगडतें. 'एकाच्या दुःखांतून दुसऱ्याच्या सुख-निर्मितीची अशक्यता' हें नाट्यकर्त्रींचें प्रमेय उषेला पटल्यामुळें तिच्या मनांत क्रान्ति होते, आणि डॉ. वसन्तरावांशीं विवाह करायचा बेत ती रहित करते. पहिल्या अंकांत किशोरीला लागलेलें ग्रहण शेवटच्या अंकात निखालस सुटतें.

ही सर्व किमया घडवून आणणारें इंदिराबाईचें भाषण मनोविश्लेषणाचा एक उत्कृष्ट नमुना होय. वरवर जरी इंदिराबाई उषेला उद्देशून बोलत आहेत असें आपल्याला वाटलें तरी, वस्तुतः त्या आरंभापासून अखेरपर्यंत स्वतःशींच बोलत असतात. इंदिराबाईच्या या भाषणांत, प्रथम पत्नीची जागा घेणाऱ्या द्वितीय पत्नीच्या कांटेरी जीवनाचा चित्रपटच आपण पाहत आहों अशी आपली क्षणभर समजूत होते. लग्न झाल्यावर प्रथम पत्नीची पावलोंपावलीं आठवण करून देणाऱ्या (अलंकार वगैरे) लहानसहान प्रसंगांनीं नवपरिणीत वधूची झालेली कावरीबावरी, असहाय स्थिति, मातृपद प्राप्त झाल्यावर तिनें अनुभविलेलें अपरिमित सुख, आणि मुलगा निवर्तल्यामुळें (जणूं काय आपल्या पापाचें प्रायश्चित्तच!) तिच्या वांट्यास आलेलें अपरिमित दुःख इत्यादि द्वितीय पत्नीच्या मनांतील धागेदोरे उकलून दाखविणारें हें संभाषण नाट्यकर्त्रींच्या मानसशास्त्राच्या ज्ञानाचा, सूक्ष्म अवलोकनाचा आणि कल्पनाशक्तीचा भक्कम पुरावा होय. 'जुगार' नाटकाला वाङ्मयांत चिरंतन स्थान मिळालें तर, तें या इंदिराबाईच्या भाषणाच्या आधारावरच.

'जुगार' नाटकाच्या चार अंकांत तीन संस्मरणीय प्रवेश आहेत: पहिला उषा आणि वसन्तराव यांच्या प्रणयचित्रणाचा; दुसरा उषा आणि बाबासाहेब यांच्या दणदणीत वाग्युद्धाचा; आणि तिसरा उषा आणि इंदिरा यांच्या संभाषणाचा. प्रणय असो नाहीं तर कलह असो, सौ. दीक्षित आपलें सर्वस्व त्यांत ओततात. म्हणूनच त्यांनीं आपल्या प्रतिभेनें रंगविलेले हे प्रसंग पाहत असतां आपणहि आपलें देहभान विसरून जातों.

डॉ. वसन्तरावांच्या द्वितीय विवाहाचें हें कथानक म्हणजे नाट्यकर्त्रींच्या सृजनशक्तीचें फल. येथें कोणाचीच उसनवारी नाहीं. कथानक साधेंच असलें, तरी त्याचा प्रत्येक भाग जागच्या जागीं, ठाकठीक,









अनुक्रमणिका

अगदीं रेखीव, कोरीव पद्धतीनें बसविण्यांत लेखिकेचें चातुर्य दिसून येतें. याचें एक उदाहरण द्यायचें, तर श्रीकान्तानें उषेला सांगितलेली स्वतःच्या बालपणींची हकीगत–शारदाकाकू ( उषेची आई ) आपल्याशीं चोरुन पत्ते खेळत असत वगैरे. यामुळें उषेला श्रीकान्ताबद्दल विशेषच आपुलकी वाटूं लागते. उषा आणि श्रीकान्त एकमेकांना शारदाकाकूंचे फोटो दाखवितात, हें अशा प्रकारचें दुसरें उदाहरण. आणि उषेनें आपल्या आईसारखा वेष करावा ही श्रीकान्ताची कल्पना हें तिसरें उदाहरण.

संयमाचा नियम पाळूनहि सौ. दीक्षितांनीं कथानकाच्या शोभेंत आणि मनोरंजकतेंत भर घातली आहे. प्रतीकांचा उपयोग हें एक शोभेचें साधन आहे. 'जुगार' नाटकांत सौ. दीक्षितांनीं प्रतीकांचा दोनदां उपयोग केला आहे. प्रथम, जेव्हां उषा चैतन्य-देवाला आपल्याला पडलेल्या स्वप्नाची हकीगत सांगते तेव्हां. उषेच्या या स्वप्नांत वसन्तानें तिला झोपाळ्यावर बसवलेली असते. इतक्यांत श्रीकान्त येतो आणि जोराचे झोके देऊन झोपाळ्याच्या सांखळ्या तोडून टाकतो. वसन्ताशीं ठरलेला उषेचा विवाह मोडतो त्याचें हें प्रतीक. दुसरें प्रतीक इंदिराबाईंच्या भाषणांत घातलें आहे. देवघरांत नंदादीप लावावयाला त्या गेल्या; वाऱ्याची झुळूक आली आणि नंदादीप विझून गेला. इंदिराबाईंचा मुलगा निवर्तला त्याचें हें प्रतीक. नकळत का होईना, इंदिराबाईंनीं उषेच्या गर्भवती आईचा बळी घेतला होता.

चैतन्यदेवाचें पात्र हें एक कथानकाला जोडलेलें ठिगळ होय. कथानकाशीं या पात्राचा एकजीव होत नाहीं. अशा एखाद्या पात्राची आवश्यकता होती. परंतु आहे त्यापेक्षां निराळ्या स्वरूपांत या पात्राचें रंगभूमीवर दर्शन झालें असतें, तर नाटकाची रचना जास्त सुबक दिसली असती. चैतन्यदेवाच्या विकृत भाषणानें नाटकगृहांत पुष्कळ हंशा पिकतो, पण विकृत भाषणाचा हा विनोद कांहीं उच्च प्रकारचा विनोद नव्हे. एवढें मात्र खरें, कीं चैतन्यदेवाच्या भाषणानें या पात्राला एक प्रकारची आत्मीयता येते.

किशोरीला एकदांहि रंगभूमीवर आणली नाहीं हें ' जुगार ' नाटकाचें वैगुण्य होय. सर्व नाटकभर तिचें अस्तित्व आपल्याला जाणवतें, पण अभावानें.

नाटकाचा पहिला प्रवेश फारच संथ आणि मिळ-मिळीत वाटतो. त्यापेक्षां किशोरी आणि बेबीच्या संभाषणानें नाटकाची सुरुवात केली असती तर रंगभूमी वर विद्युल्लतेची प्रभा पडली असती आणि प्रेक्षकांचे डोळे एकदम रंगभूमीकडे वळले असते ! A good beginning is half the whole या न्यायानें नाटकाचा पहिला प्रवेश दणदणीत असावयाला पाहिजे! शेक्स्पिअरच्या ' मॅक्बेथ 'सारखा, नाहीं तर शॉच्या ' पिगमेलिअन 'च्या पहिल्या प्रवेशासारखा.

कथानकांतील आणखी एक दुवा असाच ढिला आहे. उषेची आई गर्भवती असतां तिनें एकदम गृह-त्याग करून ब्रह्मदेशाला जाणें ही घटना चमत्कारिक नव्हे का ? अपत्य नाहीं म्हणून जर बाबासाहेब दुसरें लग्न करावयाला प्रवृत्त होतात, तर उषेच्या आईनें स्वतःला होणाऱ्या अपत्याची बाबासाहेबांना सूचना देणें जरूर होतें. घरांतील छळणूक हें जर गृहत्यागाचें कारण, तर मग आधींच घर सोडावयाला हवें होतें.

' जुगार ' नाटकाच्या कथानकावर असे कांहीं अल्पस्वल्प आक्षेप घेतां येतील. तरी पण एकंदरींत हें कथानक आकर्षक आहे हें कोणाला नाकारतां येणार नाहीं.

प्रमेयप्रधान नाटकांत संवाद, वादविवाद आणि चर्चा हें आधुनिक नाटकाचें तन्त्र सर्रास वापरलेलें असतें. नामवंत नाटककार शॉ यांच्या म्हणण्याप्रमाणें आधुनिक नाटकाचा अर्थ चर्चात्मक नाटक. चर्चेनेंच नाटकाला सुरुवात. व पुढें सर्व नाटकभर या चर्चेचा विस्तार होत जातो तो इतका कीं, अखेर नाटक म्हणजे चर्चाच असें समीकरण निर्माण होतें. एखाद्या सामाजिक प्रश्नाची चर्चा करून प्रेक्षकांच्या सुप्त विचारशक्तीला धक्के देऊन ती हलवून जागी करावयाची हें नाटककाराचें ध्येय आणि तें साध्य करावयाचें तर चर्चेसारखें अमोघ साधन नाहीं; तेव्हां नाटकांत सगळीकडे चर्चेला वाव देणें हें नाटककाराचें कर्तव्यच ठरतें. तथापि, ही चर्चा कंटाळवाणी होत नाहीं; कारण संवाद, वादविवाद, चर्चा हा एक द्वंद्वयुद्धाचा प्रकार आहे आणि या द्वंद्वयुद्धांत उत्तर, प्रत्युत्तर, कोटी, प्रतिकोटी, थट्टा, विनोद, उपरोध, उपहास, विडम्बन इत्यादि शस्त्रांचा








खणखणाट ऐकूं येतो. आपल्या तेजानें तळपणारीं हीं शस्त्रें प्रेक्षकांचे डोळे दिपवून टाकतात. त्यामुळेंच प्रेक्षकांचें लक्ष रंगभूमीवर सारखें टिकून राहतें.

संवाद, वादविवाद, चर्चा या तंत्राचा कुशल उपयोग करून नाटककार प्रेक्षकांना नवी दृष्टि प्राप्त करून देतो. हंसतखेळत, संवादाच्या साहाय्यानें तो प्रेक्षकांना गंभीर समस्येची ओळख करून देतो. नाटकांतील या संवादांनीं प्रेक्षकांचें मनोरंजन होतें, पण हें मनोरंजन म्हणजे कडू औषधावरील साखरेचें आवरण. एवढाच त्याचा उपयोग.

'जुगार' नाटकांतहि नाट्यकर्त्रीनें संवाद, वादविवाद, चर्चा हें तंत्र सरसहा वापरलें आहे. श्रीकान्त आणि बेबी, श्रीकान्त आणि डॉ. वसंतराव, श्रीकान्त व उषा त्याचप्रमाणें बाबासाहेब व उषा इत्यादि 'जुगार' नाटकांतील पात्रें परस्परांशीं बोलतात तेव्हां आपण एक द्वंद्वयुद्ध पाहतों आहों असें आपल्याला वाटतें आणि या द्वंद्वयुद्धांत श्रीकान्त आणि बेबी, श्रीकान्त आणि उषा, उत्तर–प्रत्युत्तर, विनोद–उपहास, उपरोध–विडम्बन वगैरे शस्त्रें वापरून प्रेक्षकांचे डोळे दिपवून टाकतात, विनोदाची झोड उडवून देतात. म्हणूनच 'जुगार' नाटकाचा प्रयोग चालू असतां कोणी प्रेक्षक उठून जाऊं म्हणेल, तर तें त्याला शक्य होणार नाहीं.

पहिल्या अंकांत ( पान १३ ) वैवाहिक जीवनाविषयीं बोलत असतां श्रीकान्त म्हणतो : "प्रीतिवसंताच्या पाठोपाठ अतिसहवासाची ग्रीष्माची तलखी..." पण हें त्याचें वाक्य संपायच्या आंतच बेबी त्याच्या बोलण्याची नक्कल करीत त्याला उत्तर देते. "पण सृष्टीची तलखी शान्त करावयाला वर्षाकाळच्या जलधारा वाहतात. सवतीसारखी बारा मास टिकणारी ती तलखी नसते !" सवत शब्द ऐकल्याबरोबर इंदिराबाई अस्वस्थ होतात. हा एक बेबीच्या हजरजबाबीपणाचा नमुना. आपली आई सवत आहे हें बेबीला माहीत नसतें म्हणून ती सवतीची निर्भर्त्सना करते. पण प्रेक्षकांना बेबी ही सवतीची मुलगी हें माहीत असतें. त्यामुळें हें नाटकांतील उपरोधाचें एक उदाहरण असें म्हणतां येईल. याला इंग्लिशमध्यें Dramatic Irony हें नांव आहे. याच अंकांत पुढें (पा. १८) श्रीकान्त बेबीला म्हणतो, "तुझा भरंवसा सांघिक प्रयत्नांवर, काकूंचा भरंवसा कदाचित् वैयक्तिक प्रयत्नांवर असेल." बेबी त्याला लागलीच उत्तर देते, "अन् तुझा सगळा भरंवसा भाषिक प्रयत्नांवर." बेबीच्या हजरजबाबीपणाचें हें दुसरें उदाहरण. श्रीकान्त आणि बाबासाहेब या दोघांशीं बोलत असतां बेबी म्हणते, "खरे निर्लज्जपणानें वागतात हे दुसरें लग्न करणारे लोक." बाबासाहेब एकदम हुंकारतात, "हं बेबी !" नाटकांतील उपरोधाचें हें दुसरें उदाहरण.

दुसऱ्या अंकात ( पान ३५ ) उषेला एकदम परत आलेली पाहून डॉ. वसन्तराव म्हणतात : "आलीस तर निदान छत्रीबित्री तरी घेऊन यायचं होतंस. ऊनबीन नाहीं वाटतं !" उषा ताडकन् उत्तर देते : "आहे. म्हणूनच सावली शोधायला आलें." पुढें ( पान ३६ ) वसन्तराव म्हणतात, "कां माझा अंत पाहातेस ?" त्यावर एक क्षणाचाहि विलंब न करतां उषा त्यांना उत्तर देते, "मी तुझा अंत पाहातें का तूं माझा अंत पाहातोस ?" पहिल्या अंकांत ( पा. २१ ) बेबी श्रीकान्ताला सांगते ( आणि तिचे बाबाहि तेथें हजर असतात ). "मी काळीं निशाणें घेतलेल्या हजार विद्यार्थिनींचें पथक घेऊन वसन्तरावांच्या या लग्नाच्या वेळीं हजर राहीन, आणि सारखी घोषणा करीन कीं 'वसन्त, गो बॅक; उषा, गो बॅक; वसन्त उषा, गो बॅक." त्यावर बाबासाहेब उत्तर देतात : "छान, छान ! घोषणा अवश्य कर, पण आधीं चहा कर." गोड दुधाचें आंबट दह्यांत परिवर्तन करणारें हें भाषण नाटकांतील उपहासाचें उदाहरण म्हणून देतां येईल. तिसऱ्या अंकांत ( पान ७७ ) आपली आई बाबासाहेबांची द्वितीय पत्नी आहे हें समजल्यावर बेबी वसन्तरावांच्या बाजूनें थोडें बोलते. त्याबरोबर बाबासाहेब एकदम गरजतात : "आतां तूं त्याच्यावर प्रेम कर. चार दिवसांनीं तो हरामखोर हिलाहि कंटाळला, कीं तूं ठोक त्याच्याशीं लग्न." हा सोटेशाही विनोदाचा प्रकार. प्रेक्षकांनीं आणि श्रोत्यांनीं जीवनाचा गंभीर विचार करावा ही नाट्यकर्त्रीची भूमिका असल्यामुळें, 'जुगार' नाटकांत भरपूर विनोद असला तरी विनोद हें नाटकाचें महत्त्वाचें अंग नव्हे. विनोदानें वादविवादाला रंग चढतो. तेवढाच त्याचा उपयोग. लेखिकेचें जें जीवनविषयक तत्त्वज्ञान त्यालाच








# 'एकाच्या दुःखांतून दुसऱ्याची सुखनिर्मिति अशक्य !'

तिनें आपल्या नाटकांत अव्वल दर्जा दिला आहे. विनोदाच्या आवरणाखालीं तिनें ठिकठिकाणीं श्रोत्यांना स्वतःच्या जीवनविषयक तत्त्वज्ञानाची ओळख करून दिली आहे.

प्रेम हा 'जुगार' नाटकाचा विषय नव्हे. तरी पण प्रेमासंबंधीं उषेच्या तोंडीं जीं चार-दोन वाक्यें घातलीं आहेत त्यांसंबंधीं कोणाचें दुमत व्हावयाचें कारण नाहीं : "प्रेमाच्या राज्यांत भलती वेळ नसतेच. सर्व घटिका मंगल, शुभदायक असतात" हें उषेचें वाक्य ( पा. ३७ ), किंवा तिनेंच विचारलेला प्रश्न "कायद्याची भाषा बोलणाऱ्यांनीं कधीं प्रेमाच्या भावना अनुभविल्या असतील का?" (पा. ३९ ). श्रीकान्तानेंही प्रेमाच्या भावनेसंबंधीं सर्वांना पटतील असेच उद्‌गार काढले आहेत. डॉ. वसन्तरावांशीं बोलत असतां तो म्हणतो, "प्रेम ही खरोखरीच वैयक्तिक भावना आहे. तिच्याबद्दल कुणीं कुणाला जबाब विचारणें हा मूर्खपणा आहे" ( पा. ४५ ).

तथापि, नाटयकर्त्रीनें आपल्या विवाहविषयक तत्त्वज्ञानांत स्वतःच्या अनुभूतीचें सार ओतलें आहे. 'जुगार' नाटकाच्या ४७ पानावर श्रीकान्त म्हणतो : "लग्नाइतका दुसरा जुगारी डाव नाहीं. त्यांत प्रीतिविवाह म्हणजे सर्वस्व पणाला लावून टाकलेला फांसा. जिंकला तर ठीक नाहीं तर सर्वस्वाचा नाश !" ८८ पानावर इंदिराबाई म्हणतात, "प्रीतिविवाहामुळें बाई सुखी होऊं शकते ही कल्पनाच मला हास्यास्पद वाटते. पुरुषांचा अवखळ स्वभाव, त्याला बंधनांत ठेवण्याकरितां बायकांचा चाललेला अखंड अट्टाहास, ह्या सगळ्यांतून निर्माण झालेलें लग्न हें एक विचित्र कोडें आहे. प्रीतिविवाहानें सुटण्याइतकें तें सोपें खास नाहीं आणि त्यामुळें त्याचें जुगारी स्वरूपहि बदलत नाहीं." पुरुष-मनाचा अनुभव घेतलेली एक स्त्री हें सर्व सांगते आहे हेंही आपण लक्षांत घ्यायला हवें. 'जुगार' नाटकाच्या आरंभींच्या निवेदनांत नाटयकर्त्रीनें हेंच तत्त्वज्ञान पुनः एकदां आवर्जून सांगितलें आहे. त्यांचें असें म्हणणें कीं, विवाहसौख्याचा हमखास मार्ग अस्तित्वांत असल्याचा आज तरी कोणाला भरंवसा वाटतांना दिसत नाहीं; रूढिमार्गानें विवाह सुखमय होत नाहीं म्हणून आम्ही प्रीतिविवाहाचा जणूं काय तोडगा शोधून काढला; पण त्यानेंहि दगा दिला !

आणखी एक जीवनविषयक तत्त्वज्ञानाची बाजू म्हणजे नाटयकर्त्रीनें केलेलें स्त्रीजातीच्या धर्माचें वर्णन. ४८ पानावर दुसऱ्या अंकांत उषेशीं बोलतांना श्रीकान्त म्हणतो : "स्त्रीला मी स्त्रीजात म्हणून ओळखतच नाहीं. एक ईश्वरी शक्ति म्हणून ओळखतों. निर्मिति आणि संरक्षण हें या शक्तीचें जगांतलें कार्य." येथें आपल्याला शॉच्या 'Life-force'ची आठवण होते. तिसऱ्या अंकांत पान६० वर श्रीकान्त म्हणतो, "पुरुषांच्या आणि स्त्रियांच्या अन्तःकरणाचे धर्मच वेगळे आहेत. संस्कारसुद्धां वेगळे आहेत. आम्हां पुरुषांचीं अन्तःकरणें दुसऱ्याच्या मनाचा विचारसुद्धां न करतां सुखाचा थेंब अन् थेंब शोषून घेण्याकरितां हपापलेलीं; तर तुम्हां बायकांचीं अन्तःकरणें नील मेघांसारखीं, प्रेमजलाचा वर्षाव करून त्यांचें जीवन फुलविण्याकरितां आसावलेलीं. तुम्हां बायकांचा धर्म सूड घेण्याचा नाहींच; प्रेम करण्याचा आहे." पुढें तो म्हणतो, ( स्त्रियांनीं ) "आमचें अनुकरण न करतां, प्रगतीचे वेगळे मार्ग शोधावयाला हवेत. नवा समाज निर्माण करावयाला हवा."

'जुगार' नाटकांतील हें विवाहविषयक तत्त्वज्ञान सर्वांनाच पटेल असें नाहीं. 'स्वार्थे सयार्थे', 'तुझा अर्धा हिस्सा, माझा अर्धा हिस्सा', इंग्लिशमध्यें म्हणतात त्याप्रमाणें fifty-fifty, अशा समंजस रीतीनें विवाहित स्त्री-पुरुष वागले तर वैवाहिक जीवन सुखी होईल यांत कसलीच शंका नाहीं. कांहीं पुरुष भ्रमरवृत्तीचे असतात. तर कांहीं स्त्रियांची तीच चञ्चल, भ्रमरवृत्ति असते. जगांत दोन प्रकारचे लोक आढळून येतात–स्थिरवृत्ति आणि अस्थिरवृत्तिः जन्मभर एकमेकांवर अचल वृत्तीनें निःसीम प्रेम करीत राहणारे किती तरी स्त्री-पुरुष मला माहीत आहेत ! त्याचप्रमाणें प्रेमजलाचें जगावर सिंचन करून त्याचें जीवन फुलविणें हा जसा स्त्रियांचा तसाच पुरुषांचा-ही मनोधर्म. साऱ्या विश्वावर प्रेम करावयाचा संदेश ज्यांनीं दिला, 'वैऱ्यांशीं वैर करूं नकोस, वैऱ्याला प्रेमानें वश कर,' ही ज्यांची शिकवण ते ज्ञानेश्वर, बुद्ध, काइस्ट पुरुषच होते. सूड घेण्याच्या








बाबतींत स्त्रिया कांहीं कदम पुरुषांच्या पुढें असतात ! या प्रकरणीं द्रौपदीचें एक उदाहरण बस होईल. " स्त्रीजातीला खऱ्या सुखाचा लाभ आई-पणांत आहे " (पा. ८९) हें इंदिराबाईसंबंधी खरें असेल. इतर स्त्रियांना लग्न झाल्यावरही अनिर्वचनीय आनंद होतो. त्यांचें शरीर आणि मन आनन्दानें फुलून जातें. मातृपद मिळाल्यानंतर असाच अनिर्वचनीय आनन्द होतो. पण एकापेक्षां दुसरा आनन्द वरचढ असें आपल्याला म्हणतां येणार नाहीं. अपत्यनिर्मितीची आणि संवर्धनाची जबाबदारी स्त्री-पुरुषांत समसमान वांटून दिली आहे. पुरुषजातीपासून अलिप्त राहून केवळ स्त्रियांनाच नवसमाजाची निर्मिति करतां येणार नाहीं. स्त्री ही मानववंशाची माता आहे, हा एक बोलण्याचा पर्याय. खरें म्हटलें तर, स्त्री-पुरुष मानववंशाचे माता-पिता होत. पुरुषांचें मन ही कांहीं एक वेगळी चीज आहे असें आपल्याला म्हणतां येणार नाहीं. मूलतः मनुष्यमात्राच्या मनाचें स्वरूप एकच. वर वर दिसणाऱ्या भेदांना आपण अवास्तव महत्त्व दिलें म्हणजे मग पुरुषांचें मन निराळें आणि स्त्रियांचें मन निराळें, पुरुषांचा स्वभावधर्म वेगळा आणि स्त्रियांचा स्वभावधर्म वेगळा अशी भाषा आपण बोलूं लागतों.

असो. नाट्यकर्त्रीच्या तत्त्वज्ञानाशीं आपण सहमत होऊं शकलों नाहीं तरी, 'जुगार' ही एक उत्कृष्ट कलाकृति आहे अशी कबुली द्यायला कसलीच हरकत नाहीं. महाकवि मिल्टनचीं मतें आपणांला पसंत नसलीं म्हणून काय झालें ? कवीचा त्यांच्यावर विश्वास होता का नाहीं आणि त्यानें तीं प्रांजलपणें, जिव्हाळ्यानें आपल्यापुढें मांडलीं आहेत का नाहीं, एवढेंच पाहावयाचें रसिकांचें काम. 'जुगार' नाटकासंबंधींही आपल्याला हेंच म्हणतां येईल.

नाटकांतील संवादांनीं स्वभावदर्शनाचें काम सुकर होतें. निरनिराळ्या पात्रांच्या भाषणांत त्यांच्या विशिष्ट स्वभावांचा आविष्कार होतो. एकेका पात्राचें भाषण म्हणजे एक खिडकीच होय. या खिडकींतून आपल्याला त्या पात्राच्या अंतरंगाचें दर्शन होतें. 'जुगार' नाटकांतील बेबीची तडफ, मनमोकळेपणा, उत्साह आणि अल्लडपणा वगैरे तिच्या स्वभावाचे विशेष तिच्या भाषणांत दिसून येतात. बेबी अगदीं सरळ आणि एकमार्गी मुलगी. जें मनांत येईल तें बोलून दाखविते. आंतबाहेर कांहीं नाहीं. आणि कुठें अन्याय दिसला कीं, आपलें सर्व बळ एकवटून त्याचा प्रतिकार करावयाची तिची तयारी. कृतिशून्य माणसांचा तिला अत्यन्त तिटकारा. पण वसन्तरावांना दोष देणारे आपण त्याच दोषाला पात्र आहोंत, हें समजल्यावर तिचा सर्व उत्साह मावळून जातो आणि ती अगदीं गोगलगाय बनते. काळीं निशाणें घेऊन " वसन्त, गो बॅक, उषा, गो बॅक " अशा घोषणा करायला निघालेली बेबी आपल्या बाबांनीं द्वितीय विवाह केला आहे हें समजल्याबरोबर त्यांना म्हणते, " बाबा, कोणत्या तोंडानें तुम्ही त्यांना (उषेला) वसन्तरावांशीं लग्न करूं नका असें सांगणार ? " या तिच्या भाषणावरून बेबी किती सच्च्या दिलाची मुलगी आहे हें आपल्याला कळून येतें.

बेबीचे वडील बाबासाहेब हे कुटुंबांतील हुकुमशहा. त्यांचा आपला लष्करी खाक्या. आपण आज्ञा करावयाची आणि इतरांनीं ती मानायची एवढेंच त्यांना समजतें. ते म्हणतात त्याप्रमाणें त्यांना प्रीतीचें गौडबंगाल कळत नाहीं. दुसऱ्याचें मन वळविण्याचा मार्ग संमत नाहीं. ते श्रीकान्ताला सांगतात, (पान २६) " तुमचें हें हृदयपालट-तंत्र आपल्याला बिलकुल पसंत नाहीं. आम्हांला एक गोष्ट माहीत आहे. एखाद्याशीं विरोध दाखवावयाचा म्हणजे त्याला सरळ सामना द्यायचा. " बाबासाहेब खरेखुरे जुन्या जमान्यांतले. त्यांच्या दृष्टीनें जगांतलीं माणसें म्हणजे बुद्धिबळांतील प्यादीं. उषा डॉक्टर वसन्त-रावांवर प्रेम करते, तिला आपण एक डॉक्टर वर पाहून देऊं, हजारों रुपये हुंडा देऊं म्हणजे ती वसन्ताशीं लग्न करायचा आग्रह सोडून देईल अशी त्यांची भोळी समजूत. अधिकार आणि संपत्ति यांची बाबा-साहेबांना कधीं वाण भासली नाहीं म्हणून त्यांच्या स्वभावांत विलक्षण ताठरपणा आला आहे. या बाबा-साहेबांच्या छोटेशाही आडमुठेपणाच्या पार्श्वभूमीवर श्रीकान्ताचा मनमिळाऊपणा आणि इंदिराबाईचें दयामय अन्तःकरण उठावानें प्रेक्षकांच्या लक्षांत येतें. नाटकांत अशा पात्रांची जरुरी असते. कृष्णवर्णाची पार्श्वभूमि असली म्हणजे शुभ्रवर्णाची शोभा खुलून



अनुक्रमणिका

दिसते. गतकाळाचें प्रतीक या दृष्टीनें बाबासाहेबां-कडे पाहणें योग्य होईल. त्यांना नव्या पिढीच्या प्रीतिविवाहाच्या कल्पना तिरस्करणीय वाटल्या तर त्यांत नवल काय ? त्यांनीं द्वितीय विवाहाच्या वेळीं मनाची थोडीफार फसवणूक करून घेतली असेल, पण तो त्यांचा अक्षम्य दोष असें आपल्याला म्हणतां येणार नाहीं.

उषा कांहीं बाबतींत थेट वडिलांची प्रतिमा. वडिलांच्याप्रमाणें तिचाहि करारी स्वभाव. आपला प्रियकर डॉक्टर वसन्त हा आपल्या बहिणीचा पति हें समजल्यानंतरही ती डॉक्टरांशीं विवाह करायचा आपला निश्चय बदलायला तयार होत नाहीं. या बाबतींत डॉक्टर वसन्तरावांवरील तिचें अमर्याद प्रेम तिला पुढें ढकलीत होतें. पण त्यापेक्षांही पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें तिला पुढें ओढीत नेणारी सूडाची बलवत्तर भावना ' डॉक्टरांशीं तूं लग्न केलेंच पाहिजेस ' असें तिला बजावीत होती. डॉक्टर वसन्तरावांशीं प्रेमाच्या गुजगोष्टी करणारी उषा नवनीतासारख्या कोमल आणि मृदु हृदयाची, पण तीच उषा आपल्या मातेच्या दुःखी जीवनाला सर्वस्वीं जबाबदार अस-णाऱ्या आपल्या पित्याशीं—बाबासाहेबांशीं—बोलतांना वज्रासारख्या कठिण शब्दांचा त्यांच्यावर भडिमार करते. उषेच्या प्रत्येक भाषणांत आणि कृतींत तिच्या स्वावलंबी वृत्तीचा आणि आत्मविश्वासाचा प्रत्यय आपल्याला येतो. इतर नाणीं बद्द वाजत असतील, हें नाणें मात्र खरें, खणखणीत आवाज देणारें आहे अशी आपली खात्री होते. कोणाच्याहि पुढें मान न वांकविणाऱ्या उषेच्या मनांत इंदिराबाईचें भाषण ऐकल्याबरोबर क्रान्ति घडून येते. एकाच्या दुःखांतून दुसऱ्याच्या सुखाची निर्मिति होऊं शकत नाहीं हें सत्य तिला कळून चुकतें, आणि आतापर्यंत अचल वाटणारा तिचा निश्चयाचा दुर्ग एकदम कोसळून पडतो. तसें म्हटलें तर वरवर दयाशून्य दिसणारी, सूडाच्या भावनेनें जळणारी उषा अन्तःकरणाची हळुवार आहे. आपल्या आईचा श्रीकान्त लाडका होता हें तिला समजताक्षणींच तिचें मन श्रीकान्ता-कडे ओढलें जातें आणि ती बुद्धिमती असल्यामुळें, श्रीकान्ताचें स्त्रीजातीच्या मूलतः कोमल आणि प्रेमळ स्वभावावरचें प्रवचन ऐकल्याबरोबर त्याला धन्यवाद देते. " किती चांगलें तुम्ही बोलतां ! " असें म्हणते. उषेच्या अंगांतला कण अन् कण चैतन्यानें भरलेला आहे. डॉक्टर वसन्तराव तिला विद्युल्लतेची उपमा देतात; म्यानांतून उपसलेल्या तरवारीशीं तिची तुलना करतात. उषेचीं भाषणें ऐकलीं आणि तिची कृति पाहिली म्हणजे या दोन्ही उपमा सार्थ आहेत अशी आपली खात्री होते. एकंदरींत उषेचें स्वभावचित्र नाट्यकर्त्यांच्या स्वभावचित्रणकौशल्याचें एक उत्कृष्ट निदर्शन होय असें म्हणावयाला हरकत नाहीं.

डॉक्टर वसन्तरावांची आपण कींव करतों. मूळ-चा त्यांचा सरळ स्वभाव. प्रेमपिशाच्चाच्या तावडींत सांपडल्यामुळें ते दिङ्मूढ होतात आणि हें प्रेमपिशाच्च जिकडे नेईल तिकडे जायची त्यांची तयारी असते. प्रेमाची ही भूतबाधा झाल्यामुळें त्यांना आपण काय बोलतों आणि काय करतों याची शुद्ध राहत नाहीं. सुकाणूं नसलेली नौका जशी समुद्रपृष्ठावर वारा नेईल तिकडे जाते तसें हें डॉ. वसन्तरावांचें प्रणयी जीवन. उषा त्यांना भेटली नव्हती तोंपर्यंत त्यांच्या आयुष्याचा प्रवाह संथपणें वाहत होता. उषा आल्याबरोबर या प्रवाहांत लाटांवर लाटा उसळूं लागल्या आणि त्यांत गरगर गिरक्या घेणारे भोंवरे निर्माण झाले. तरी किशोरीवर आपण अन्याय करतों आहों याची त्यांना जाणीव होती. माणुसकी-ला ते अगदींच पारखे झाले नव्हते म्हणून आपण त्यांची कींव करतों.

बेबी, उषा, बाबासाहेब, डॉक्टर वसन्तराव या सर्वांचा श्रीकान्त मित्र, बन्धु आणि साहाय्यकर्ता. इंदिराबाईंची सारी भिस्त त्याच्यावर; कारण श्रीकान्त विश्वकुटुंबी. ' बुडत्यास हात द्यावा ' हें त्याचें ब्रीदवाक्य. कोणाच्याही हितसंबंधांत तो अडकून राहत नाहीं आणि कोणालाही मदत करावयाची त्याची तयारी. एखाद्या शान्त स्थितप्रज्ञासारखें त्याचें बोलणें. प्रसंग कितीही बिकट असला तरी तो भिचकून जात नाहीं. बाबासाहेब त्याला पुष्कळ टाकून बोलतात तरी त्याच्या शान्तीचा भंग होत नाहीं. दुसऱ्यांचीं दुःखें आत्मसात् करून त्यांचें चुकतें कुठें तें हळुवारपणें त्यांना समजावून सांगणें हें त्याचें जीवितकर्तव्य. श्रीकान्ताला विनोदाची देणगी असल्यामुळें सर्व संकटांना तो हंसत खेळत तोंड देतो. निगर्वी,








सालस अशी त्याची वागणूक. समंजसपणा, संभाषण-चातुर्य, विद्वत्ता, व्यवहारकुशलता या त्याच्या गुणांनीं तो सर्वांना हवासा वाटतो. स्वतः त्याला कशाचीच अपेक्षा नाहीं, म्हणून नाटकांतील सर्व पात्रें त्याच्यावर विश्वास टाकतात. कोणत्याही विकाराला तो बळी पडत नाहीं, आणि आपत्तीच्या वेळीं घाबरून जात नाहीं. नाटकांतील पात्रांच्या भिन्न भिन्न वृत्ती-प्रवृत्तींना साजेल, शोभेल असें त्याचें वर्तन. इंदिराबाईशीं तो गंभीरपणानें वागतो, बेबीची थट्टामस्करी करतो, डॉक्टर वसन्तरावांशीं युक्तिवाद करून, त्यांच्याच तंत्रानें घेऊन ('प्रेम कर, अनिर्बंध प्रेम कर') त्यांना द्वितीय विवाहापासून परावृत्त करायचा प्रयत्न करतो. उषेशींही तो युक्तिवाद करतो आणि न कळत का होईना पण, त्याच्या विद्वत्तेची आणि संभाषण-चातुर्याची मोहिनी तिच्यावर पडते. ("तुम्ही किती चांगलें बोलतां"). उषेच्या आईची स्वतः विषयींच्या ममतेची हकीगत सांगून तो तिला आपलीशी करून घेतो.

नाटकांतील तत्त्वज्ञानाचा बराचसा भाग श्रीकान्ताच्या तोंडीं घातला आहे. "प्रेम ही खरोखरच वैयक्तिक भावना आहे; लग्नाइतका दुसरा जुगारी डाव नाहीं; स्त्री ही एक ईश्वरी शक्ति म्हणून मी ओळखतों. निर्मिति आणि संरक्षण हें या शक्तीचें जगांतलें कार्य; बायकांचा धर्म सूड घेण्याचा नाहीं, प्रेम करण्याचा आहे" इत्यादि. 'जुगार' नाटकांतील किशोरीच्या संसाराची विस्कट-लेली घडी नीट बसवायची कामगिरी श्रीकान्ता-वर सोपविलेली असते. इंदिराबाईच्या साहाय्यानें तो ती पार पाडतो. आपलें वादविवादांतील कौशल्य आणि व्यवहारचातुर्य पणास लावतो. तरी पण आपण कांहीं विशेष करतों आहों याची त्याला जाणीव नसते. 'कर्म कर, पण त्याचें फल मला अर्पण कर' ही भगवद्गीतेची शिकवण त्याच्या अंगीं बाणलेली आहे.

इंदिराबाईही जुन्या जमान्याच्याच. बाबासाहेबांशीं संसार करायचा प्रसंग आल्यामुळें त्यांची चांगली सत्त्वपरीक्षा झाली. मूळचें त्यांचें आर्यस्त्रीचें प्रेमळ आणि दयामय मन, त्यांना भोगाव्या लागलेल्या यातनांनीं सात वेळां भट्टींत घातलेल्या सुवर्णाप्रमाणें तावूनसुलाखून निघालें. त्यांच्या दैवानें त्यांना क्षमाशीलतेची आणि सहनशीलतेची शिकवण दिली. 'तुका म्हणे उगें रहावें। जें जें होईल तें तें पाहावें ॥' एवढेंच आपल्या हातांत, आपण दुसरें काय करणार, असा त्यांचा स्वभाव बनला. बेबीनें त्यांच्या-वर केलेला निष्क्रियतेचा आरोप अगदींच खोटा नाहीं. तथापि, सहनशीलतेला मर्यादा असतातच. आपल्या मुलीवर गुदरलेलें संकट दूर करण्याचें सामर्थ्य श्रीकान्ताच्यांतही नाहीं हें इन्दिराबाईच्या लक्षांत येतांच, त्या कार्यप्रवृत्त होतात. आपल्या अंगीं असलेलें सर्व शहाणपण, आपल्या अनुभवांनीं शिकविलेलें ज्ञान, आपली जन्मजात वत्सलता आणि परहिततत्परता यांच्या साहाय्यानें त्या उषेचें मन वळविण्याचा प्रयत्न करून पाहातात, आणि त्यांत त्यांना कल्पनातीत यश येतें. उषेच्या पुढें कोणतें विषाचें ताट वाढून ठेवलें आहे याची तिला त्या जाणीव करून देतात. यामुळें किशोरीवरचें संकट टळतें, आणि मातृहीन उषेला पूर्वीच्या मातेइतकीच वात्सल्यपूर्ण माता मिळाल्याचा आनंद होतो. नाटकांतला हा अखेरचा प्रसंग म्हणजे एक अविस्मरणीय घटना होय. उंसाच्या चिपाडासारखें निर्जीव झालेलें इंदिराबाईचें मन किशोरीवरील संकटानें एकदम पेट घेतें आणि जळत्या, जागत्या ज्योतीचा पराक्रम करून दाखवितें. एखादा सामान्य सैनिक प्रसंग आला म्हणजे असामान्य बहादुरी गाजवून परमवीरचक्र मिळवितो, तशीच ही इंदिराबाईची बहादुरी. उषेशीं केलेल्या भाषणांत त्या आपल्या दुःखी-कष्टी विदारलेल्या मनाचें दर्शन आपल्याला घडवितात आणि संसारांतील हाल-अपेष्टांनीं करपले-ल्या मनाला मातृपद प्राप्त झाल्यानंतर केवढें समाधान होतें याचेंही वर्णन करतात. त्याचप्रमाणें एकाच्या दुःखांतून दुसऱ्याच्या सुखाची निर्मिति होऊं शकत नाहीं हें तत्त्व उषेला पटवून देतात.

'जुगार' नाटकांतील स्वभावदर्शन हें असें आहे. केवळ स्वभावदर्शनाकरितां स्वभावदर्शन असें त्याचें वर्णन करतां येणार नाहीं. तत्त्वप्रधान नाटकांत जें तत्त्वप्रतिपादनाकरितां कथानक, तीच गोष्ट स्वभावदर्शनाची. तत्त्वप्रतिपादनाकरितां जेवढा स्वभावदर्शनाला वाव देतां येईल तेवढाच द्यावयाचा.








# ' एकाच्या दुःखांतून दुसऱ्याची सुखनिर्मिति अशक्य ! '

श्रीकान्त आणि इंदिराबाई या दोघांचें स्वभावदर्शन नाटकांतील प्रमेयाला सर्वस्वीं उपकारक आहे हें समजायला वेळ लागत नाहीं. जीवनाचा गंभीर विचार करणारीं हीं पात्रें प्रेक्षकांनाही जीवनाचा गंभीर विचार करावयाला प्रवृत्त करतात. एका निराळ्या दृष्टीनें का होईना, पण बाबासाहेब व उषा यांच्यासंबंधींही आपल्याला हें विधान करतां येईल.

आधुनिक नाटकाची रचना कलात्मक असते. कथानक, संवाद, स्वभावदर्शन—या सर्वांनीं आपापल्या पायरीनें वागायचें हा आधुनिक नाटकाचा दंडक. कथानक, संवाद, स्वभावपरिपोष सर्व कांहीं प्रमाणशीर आणि नियमबद्ध. राजाच्या भोंवतीं जसा सचिवगण, तसेंच तत्त्वज्ञानाचा अधिकार मान्य करणारे कथानक, संवाद, स्वभावदर्शन इत्यादि त्याचे सचिव तत्त्वज्ञानाची साथ करण्याकरितां त्याच्या सभोंवतीं मंडलाकार बसविलेले असतात.

याचा अर्थ असा नव्हे कीं, नाटकांतील श्रीकान्त, इंदिराबाई वगैरे पात्रें नाट्यकर्त्रीच्या हातांतल्या कळसूत्री बाहुल्या आहेत; नाट्यकर्त्री नाचवील त्या-प्रमाणें नाचायचें आणि बोलवील त्याप्रमाणें बोलायचें ! वरील सर्व पात्रांना स्वतंत्र अस्तित्व आहे आणि या त्यांच्या स्वतंत्र अस्तित्वानें हीं पात्रें आपलें मनो-रंजन करूं शकतात. वास्तव जगांतील आपल्याला परिचित असलेल्या माणसांप्रमाणेंच हीं माणसें स्वतःच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वानें प्रेक्षकांचें लक्ष आपल्याकडे वेधून घेतात, पण मर्यादित स्वरूपांत; नाटकांतील तत्त्वज्ञानाचा परिपोष करण्यापुरतेंच.

आधुनिक नाट्याचा हाच विशेष कीं, त्यांतलें कथानक सैरावैरा धांवत नाहीं; त्याचप्रमाणें स्वभावदर्शनही मोकाट सुटलेलें आढळून येणार नाहीं. आधुनिक नाटकांतल्या संवादांचेंही असेंच संयमित स्वरूप असतें. भाषाही मोहक आणि चटकदार. परंतु उगाच उपमारूपकांची किंवा सुंदर शब्दांची खैरात केलेली दिसून येणार नाहीं. ' जुगार ' हेंही आधुनिक पद्धतीनें लिहिलेलें नाटक. म्हणूनच या नाटकांत बोध आणि कला यांचा समन्वय केलेला दिसून येईल. नाट्यकर्त्रीनें सर्वत्र संयमाची कदर बाळगली आहे. वायफळ घटना, वायफळ पात्रें, वायफळ संवाद, वायफळ शब्द आणि अलंकार यांना मज्जाव केला आहे. जुगार नाटकाचा आटोपशीरपणा, सुटसुटीत-पणा हें नाट्यकर्त्रीच्या संयमाचें फल. संयमाशिवाय कलाकृतीची निर्मिति होऊं शकत नाहीं. एका थोर कलाकारानें म्हटल्याप्रमाणें, नको असेल त्याचा त्याग करणें याचेंच नांव कला—( All art does but consist in removing surplusage ). इतर आधुनिक नाटकांप्रमाणें ' जुगार ' नाटकांत प्रवेश नाहींत. एकेक अंक म्हणजेच प्रवेश. स्वगत भाषणा-चाही कुठें उपयोग केलेला दिसून येणार नाहीं. इंदिराबाईचें भाषण स्वगत भाषणासारखें वाटतें, पण वस्तुतः तें उषेला उद्देशूनच केलेलें आहे. त्याच-प्रमाणें स्वभावदर्शनाच्या कामीं संवाद हेंच साधन वापरलें आहे. नाट्यकर्त्रीनें स्वतःच नाटकांतल्या पात्रांची उगाच माहिती दिली नाहीं आणि त्यांच्या स्वभावाची चिकित्सा केली नाहीं.

' जुगार ' नाटकांतील प्रमेयाचा विचार करायचा म्हणजे एकाच्या दुःखांतून दुसऱ्याच्या सुख-निर्मितीची अशक्यता या तत्त्वाचा विचार करायचा; याचाच अर्थ जीवनाचा गंभीर विचार करायचा. नाट्यकर्त्रीला हें तत्त्व पुरेपूर पटलें आहे. जगांत मात्र आपल्याला याच्या उलट अनुभव येतो. आपण आपल्या नित्याच्या व्यवहारांत असें पाहतों कीं, एकाच्या मानेवर पाय देऊनच दुसरा आपली उंची वाढवितो. ' पंत मेले आणि राव चढले ' ही जगाची रीत ! आणि ज्या प्रतिपक्ष्याच्या उरावर बसून आपण आपल्या विजयाचें शिंग फुंकतों तो प्रतिपक्षी आपला शत्रु असतो असाही नियम नाहीं. ' जीवो जीवस्य जीवनम् ' हा निसर्गाचा दंडक. बडा मासा छोट्या माशाला गिळंकृत करतो. वाघ शेळीला फाडून खातो. मनुष्य तर सर्वभक्षक काळच ! राजकीय क्षेत्र असो, नाहीं तर क्रीडाक्षेत्र, वाङ्मयक्षेत्र असो किंवा रणक्षेत्र असो; दुसऱ्याचा पराभव, मानहानि किंवा मृत्यु यांतच आपल्या सुखाचें मूळ सांपडेल. फ्रेंच भाषेंत एक म्हण आहे : The King is dead. Long live the King ! एका राजाच्या मृत्यूनें दुसऱ्या राजाला सुखाचा ठेवा हस्तगत करतां येतो !

आणखी एक असा विचार कीं, आजचें जें सुख आहे त्याची कालान्तरानें दुःखांत परिणति होते.

मातृपदाचा अनिर्वचनीय आनंद पहिलें मूल होतें त्या वेळीं. एका पाठीमागून एक दहाबारा मुलें झालीं म्हणजे 'काय मेल्या कार्ट्यांचा जंजाळ!' असें माता म्हणूं लागते. याशिवाय आपण असें पाहतों कीं, दुःख जरी प्रथमदर्शनींच अनिष्ट वाटलें तरी, अखेर तें हितकरच होतें. दुःखाशीं झुंज देऊन मनुष्याला आपलें बळ अजमावितां येतें. दुःखाशीं सामना देतांना त्याच्या धैर्य, औदार्य वगैरे गुणांची परीक्षा होते. उदबत्ती जळत असतां तिचा किती मधुर सुवास सुटतो! त्याप्रमाणें आपत्कालीं मनुष्याच्या धैर्य, औदार्य वगैरे गुणांचा आविष्कार होतो. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सुख आणि दुःख एकमेकांपासून जितकीं दूर आहेत असीं आपल्याला वाटतात, तितकीं तीं दूर नाहींत. सुख ही जर नाण्याची सुलट बाजू तर, दुःख ही उलट बाजू. सुख दुःखाच्या पलीकडे आपली दृष्टि पोंचली म्हणजे आपलें तत्त्वज्ञान फलदायी होईल.

---

# आम्ही दोघे—

'होण्यां'तील शक्यता
आनंद, गति,
'आहे'तील स्थितीहून
उमाप, असीम;
म्हणूनच आम्ही
देहाच्या धनुष्यावर
इच्छेची दोरी ताणून
स्वप्नांच्या बाणांचा
करितों वर्षाव
मुसमुशीत भविष्यावर!

आम्ही दोघे:
प्रयोगशाळेंतील
विज्ञान-महर्षी;
जीवनयोगाचे
उपासक कलावन्त.
दुबळ्या इंद्रियांचा
पांगळा आत्मा
चढणार कसा
भविष्यकालाची
खडी चढण!
म्हणून करतों
आम्ही दोघे
इंद्रियांची पूजा
आत्म्याच्या प्रकाशांत.
मेघमंदिरांतील
विद्युत्कणांची
प्रकाशमय पाउलवाट
पाहाणाऱ्या द्रष्ट्यांना
असतात अनुभूती
पुष्कळ इंद्रियातीत!
विज्ञान-महर्षी
इंद्रियें स्वीकारून
होतात इंद्रियातीत
अनुभवाचे धनी.
इंद्रियांचा दुवा
जोडतांच होतात
अनुभूती जिवन्त!
आणिक कलावन्त
अमूर्त आत्म्याला
असतात आकारीत
असेच इंद्रियांतून;
जाणिवेच्या गुहेंत
घेतात निरखून
आत्म्याची पाउलवाट;
आणि भोगतात
'होण्यां'तील शक्यता
आनंद, गति,
जगाच्या अगोदर!
इंद्रियांतून जातात
इंद्रियातीत ज्ञानाकडे.
याच ज्ञानांतून
होतात निर्माण
दुर्दम्य आशा,
ज्या करतात
मानवांना प्रवृत्त
देहाच्या धनुष्यावर
इच्छेची दोरी ताणून
स्वप्नांच्या बाणांचा
करण्या वर्षाव
मुसमुशीत भविष्यावर!

कारण कालाच्या
गतिमान् चक्रावर
आमचेच हात
येणाऱ्या जीवनाच्या
ओलसर मातीला
असतात देत
आवश्यक आकार!

—विंदा करंदीकर






# 'मुंबापुरवर्तमानां'तील मराठी गोष्टीचा लेखक : हिंदु कीं अहिंदु ?

— १ —

'नवभारता'च्या ऑगस्टच्या अंकांतील प्रा. शेजवलकरांचा "'मुंबापुरवर्तमानां'तील पहिली मराठी गोष्ट" हा लेख वाचला. गोष्टीच्या स्वरूपावरून ती गोष्ट एखाद्या हिंदूनें लिहिलेली असेल असें वाटत नाहीं. त्याचीं कारणें अशीं :

(१) महाराष्ट्रीय कुटुंबांत रडणाऱ्या मुलाला शान्त करण्यासाठीं बोकड खेळणें म्हणून आणण्याची कल्पना निघणार नाहीं. (२) या काळचा कोणताहि महाराष्ट्रीय वर्ग कितीहि पुढारलेला होता असें मानलें, तरी दारांत बसलेल्या गृहिणीला छत्रीच्या टोंकानें हलविण्याची कल्पना अशा समाजाच्या स्वप्नांतहि येणें शक्य नाहीं. (३) 'या गिरस्ताचें मढें आडवें आलें' इत्यादि वाक्प्रचारांचा उपयोग एखाद्या परकीयानें आपलें मराठीचें ज्ञान मिरविण्यासाठीं कांहींसा ओढूनताणून केल्यासारखा वाटतो. (४) सत्पपरायण व सत्तपारायण अशी चूक रोमन लिपींतून संस्कृतचा अभ्यास करणारांच्याकडून होणें संभवनीय आहे. (५) गोष्टीचें स्वरूप बरेंचसें गांवढळ असलें तरी तिचा शेवट सफाईदार व कलात्मक आहे. अशा प्रकारचा शेवट करण्याची पद्धत हीहि पाश्चात्य धाटणीची वाटते.

गोष्ट जर अहिंदूनें लिहिलेली असेल तर, ती एखाद्या मिशनरी पाद्र्यानें लिहिलेली असावी कीं काय अशी शंका येणें साहजिक आहे. 'मुंबापुरवर्तमान' हें नांवदेखील पाश्चात्य वर्तमानपत्रांच्या 'Times', 'Chronicle' अशा धर्तीचें वाटतें.

प्रान्तिक भाषांतील छापखाने व वर्तमानपत्रें काढण्यांत मिशनरी लोक पुढाकार घेत असत असें या काळच्या इतिहासावरून दिसून येते. अठराव्या शतकांत डॅनिश मिशनऱ्यांनीं 'मलबारी' (कानडी ?) भाषेंतील असा छापखाना काढला होता. 'समाचार दर्पण' हें बंगाली भाषेंतील वर्तमानपत्र मिशनरी लोकांनीं १८१८ मध्यें सुरू केलें होतें. यांवरून परकीयांच्या प्रयत्नानें मराठी वर्तमानपत्र सुरू होणें या काळांत असंभवनीय नव्हतें. 'मुंबापुरवर्तमाना'ची 'एशिॲटिक जर्नल'नें घेतलेली दखल असा ऋणानुबंध सूचित करते.

—दे. अ. दाभोलकर

— २ —

प्रा. दाभोलकर यांचे विचारणीय मुद्दे लक्षांत आणूनच मी माझीं विधानें 'नवभारता'च्या दोन अंकांत केलीं होतीं. गोष्ट इंग्रजी विनोदाशीं नुकताच वरवर परिचय झालेल्या कोण्या नूतन होतकरू आद्य मराठी साहित्यिकाचें अपत्य दिसतें. पाश्चात्यांचें आपल्या समाजाच्या आचारविचारांशीं न जुळणारें हें अंधानुकरण आजहि चालू आहे. मग शतकापूर्वीच्या आरंभींच्या नवशिक्यांनीं तसें अनुकरण करणें अपरिहार्यच नव्हे काय ? लेखकाचें संस्कृत भाषेचें ज्ञान हरिदास-पुराणिकांच्या कोट्यांवरून उचललेलें असावें. गोष्टीची इंग्रजींत दखल प्रथम 'एशिॲटिक जर्नल'नें घेतलेली नसून ती 'बॉंबे गॅझेट'च्या मराठी जाणणाऱ्या कोणी उपसंपादकानें घेतली व 'गॅझेट'वरून ती 'जर्नल'नें उतरली, या हकीकतीकडे दाभोलकरांचें दुर्लक्ष्य झालेलें दिसतें. वर्तमानपत्राची सर्व कल्पना व रचना इंग्रजीवरून उतरलेली आहे हें स्पष्टच आहे. पण मिशनऱ्यांनीं 'मुंबईवर्तमान' काढलें असतें तर तें अल्पायु झालें नसतें हें निश्चित आहे. व तें कोण्या हौशी व धाडशी पण अज्ञ माणसानें काढलें असावें असा तर्क करण्यास हेंच आधारभूत सबळ प्रमाण आहे. 'दर्पणा'नंतर निघालेला 'ज्ञानोदय' अजून चालू आहे व आमचा 'ज्ञानप्रकाश' मात्र बंद होतो, ही हिंदूंची रीत शंभर वर्षांनंतर आजहि टिकून आहे. तर्क वाहतो कीं ज्या रघुनाथ हरिश्चंद्रजी प्रभृति माणसांनीं पुढें बाळशास्त्र्यांस विनावेतन संपादक करून 'दर्पण' चालविला, त्याच मंडळींनीं कदाचित् हें आद्य पण बालारिष्टयोगानें अल्पायु ठरलेलें मराठी वर्तमानपत्र काढण्यांत भाग घेतलेला असावा.

—त्र्यंबक शंकर शेजवलकर








# सारसंकलन

## श्रीअरविंदांचा अखेरीचा आजार

ऑगस्ट १५ हा श्रीअरविंदांचा जन्मदिन म्हणून आजपर्यंत साजरा होत आला आहे. आज श्रीअरविन्द आपल्या पार्थिव देहांत विराजमान नसतांना, त्यांच्या या जन्मदिनाच्या निमित्तानें असंख्य अरविंदभक्तांच्या हृदयांत त्यांच्यासंबंधींच्या स्मृती अधिकच तीव्रतेनें उचंबळून आल्या असल्यास नवल नाहीं. गेल्या ५ डिसेंबर १९५० या दिवशीं अरविंदांनीं आपल्या पार्थिव देहाचा त्याग केला. अरविंदांचें असामान्य जीवन, त्यांच्या यौगिक सिद्धी, त्यांच्या गूढ शक्ती यांविषयींचें ज्ञान सामान्य जनतेच्या आकलनाबाहेरचें असल्यामुळेंच कीं काय, सामान्य जनांना अरविंदांविषयीं एक गूढ मोहिनी वाटे. त्यांच्या योगैश्वर्यासंबंधींच्या, त्यांच्या भक्तगणांकडून ऐकूं येणाऱ्या वृत्तान्तामुळें, अरविन्दांनीं देहधर्म जिंकले आहेत व मृत्यूवरहि ते मात करूं शकतील अशी सामान्यांची समजूत होती. म्हणूनच गेल्या डिसेंबर ५ ला अरविन्दांच्या झालेल्या निर्याणाची घटना लोकांना अत्यंत अनपेक्षित आणि शोकजनक अशी होती. अरविन्दांचा हा देहत्याग म्हणजे त्यांचें विश्वकल्याणाकरितां केलेलें अत्यंत थोर आत्मसमर्पण होय, असें विद्वान् तत्त्वज्ञानाभ्यासी अरविन्दभक्तांनीं अरविन्दांच्या देहत्यागावर जें भाष्य केलें, तें सामान्य माणसांना गूढ आणि दुर्बोधच होतें. गेल्या मे महिन्याच्या 'Mother India' (मुंबई) या पाक्षिकाच्या १९ मेच्या अंकांत श्री. नीरदवरण यांनीं अरविन्दांच्या निर्याणाच्या घटनेपूर्वींचा त्यांच्या प्रकृतीचा दोन वर्षांचा त्रोटक वृत्तान्त दिला आहे. श्री. नीरदवरण हे अरविन्दांचे अत्यंत निकटवर्ती असे अन्तेवासी असून, त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेल्या गोष्टींचें वर्णन त्यांत केलें आहे. हें सर्व वर्णन मोठें हृदयस्पर्शी आहे. त्यावरून या महान् प्रतिभासंपन्न, दिव्यशक्ति योगिराजांनाहि व्याधीशीं कशी झुंज खेळावी लागली याची कल्पना येते. त्या लेखाचा संक्षिप्त सारांश पुढें दिला आहे :

"ज्या व्याधीशीं सामना करतां करतां त्यांनीं आत्मसमर्पण केलें, त्या व्याधीचीं पूर्वचिह्नें दोन वर्षांपूर्वीं दिसून आलीं. अर्थात् तीं फारच सूक्ष्म, क्षितिजावरील एखाद्या ढगाच्या ठिपक्याप्रमाणें उपेक्षणीय होतीं. परंतु श्रीअरविन्दांना या चिह्नांचें निदान करून घ्यावेंसें वाटलें. कलकत्त्याचे सुप्रसिद्ध सर्जन डॉ. संन्याल हे दर्शनाला आले होते. त्यांना प्रकृति दाखविली असतां त्यांनीं अचूक निदान केलें. ते म्हणाले कीं, 'हा प्रोस्टेटचा विकार असून याचें पहिलें चिह्न म्हणजे वारंवार लघवीला जावें लागणें हें होय. अजून काळजी करण्यासारखें नसलें, तरी काळजी मात्र घेतली पाहिजे.' पुढील संकटाची पूर्वसूचना मिळाली यामुळें सर्वांना—विशेषतः श्रीअरविंदांना बरें वाटलें. कारण शत्रु कोण याचें ज्ञान झाल्यामुळें आतां सामना उघडपणें होणार होता. या सामन्यांत अरविन्दांची जीत होणार याविषयीं अर्थातच आमची खात्री होती. परंतु त्याच वेळीं मातार्जींनीं सूचना देऊन ठेवली होती कीं, 'आम्ही दुसऱ्यांचे कितीहि असाध्य रोग बरे केले असले, तरी आमची स्वतःची गोष्ट निराळी आहे!' ... लवकरच आमच्या अपेक्षेप्रमाणें रोगाचीं चिह्नें पूर्णपणें नाहींशीं झालीं. सुमारें दोन महिन्यांनीं जेव्हां डॉ. संन्याल पुन्हां भेटले तेव्हां त्यांना श्रीअरविन्द म्हणाले : 'आतां मला त्रास होत नाहीं. मी बरा झालों आहे'—अरविन्दांचें 'सावित्री' या महाकाव्याचें लेखन चालूं होतें. एकदां तर त्यांनीं एका बैठकींत त्या काव्याच्या ४००–५०० ओळी रचून आम्हांला लिहावयाला सांगितल्या. त्या काव्यपंक्ती त्यांच्या तोंडांतून बाहेर पडत असतांना त्यांतील दिव्य








विश्वात्मक गूढ अर्थ, त्यांतील दिव्य भाषासौंदर्य यांची मोहिनी कांहीं और होती! अशा वेगानें 'सावित्री' महाकाव्य लवकरच संपणार असें आम्हांला वाटलें. अर्थात् 'सावित्री'वर जरी त्यांचें सर्व लक्ष केन्द्रित झालें होतें, तरी त्यांनीं इतर आश्रमीय कामांवरून आपलें लक्ष कमी केलें नाहीं. बऱ्याच नियतकालिकांचें वाचन, आश्रमस्थांच्या निरनिराळ्या चार-पांच भाषांतून लिहिलेल्या लेखांचें समीक्षण, प्रश्नोत्तरलेखन, पत्रव्यवहार वगैरे त्यांचीं नित्याचीं कामें चालूंच होतीं. अलीकडे त्यांच्यांत एक नवीनच शक्ति विकसित झालेली दिसून आली. मी जेव्हां त्यांना एखादा नवीन लेख वाचून दाखवावयास सुरवात करी तेव्हां ते मला विचारीतः 'हा लेख तूं पूर्वीं वाचून दाखविला आहेस का?' मी म्हणे : 'नाहीं. आजच तर तो आपल्याकडे आला आहे.' त्यावर ते म्हणत, 'हें विलक्षण आहे. मला तर वाटतें कीं, या लेखाचा शब्दन् शब्द मीं पूर्वीं ऐकला आहे!'—आश्रमस्थ साधकांच्या सुखदुःखांशीं ते सारखे समरस असत. पुढें त्यांचा आजार बळावला असतांनाचा एक प्रसंग आठवतो. ते 'सावित्री'चे अखेर-अखेरचे दोन सर्ग संपविण्यांत चूर होते. इतक्यांत बाहेरील एका साधिकेची त्यांना हांक आली. त्या साधिकेला अज्ञात रोग झालेला असून तो असाध्य ठरला होता. त्या साधिकेनें तारेनें अरविन्दांची करुणा भाकून विनविलें होतें कीं, 'मला वांचवा!' तिचीं पत्रांवर पत्रें, तारांवर तारा येत होत्या, त्या एकदम बंद झाल्या! दोनतीन दिवस असेच गेले! श्रीअरविन्द बेचैन झाले. त्यांनीं विचारलें, 'तिची कांहीं बातमी? तिनें कांहींच कळविलें नाहीं तर मी तरी यापुढें काय उपाय-योजना करणार?' पण लवकरच असें कळलें कीं त्या बाईंना आराम पडला आहे, त्या बाई आतां खड-खडीत बऱ्या होऊन आश्रमांत येऊन राहिल्या आहेत.

"गेल्या वर्षीच्या मध्याच्या सुमारास पुन्हां आजार उलटला व त्याचीं बळावण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. त्याबरोबर अरविन्दांच्या नेहमींच्या वृत्तीमध्येंहि बदल झालेला आम्हांला आढळला. ते अबोल झाले. त्यांच्या वाणींतून नेहमीं उधळणारीं सुभाषितमौक्तिकें आतां बंद झालीं. आमच्या आर्जवयुक्त प्रश्नांना 'होय', 'नाहीं' किंवा कधीं नुसतें स्मित यांशिवाय उत्तर मिळत नसे. दररोजचें काम चालूंच होतें. 'सावित्री'चा वेग कमी झाला होता. दोन सर्गांच्या हस्त-लिखिताचें पुनर्लेखन चालूं होतें. अरविन्दांचा बारकावा कांहीं विलक्षण होता! प्रत्येक ओळ निर्दोष पाहिजे, प्रत्येक विरामचिह्न तपासलें पाहिजे, या-बद्दल त्यांचा कटाक्ष होता. आश्रमीय कामामधून त्यांना 'सावित्री'करितां जेमतेम दोन तास मिळत. ते म्हणत, 'माझ्या खऱ्या कामाकरितां वेळच मिळत नाहीं!' असें चालूं असतांना एके दिवशीं ते उद्गारले : 'चला, आतां 'सावित्री' घेऊं. मला आतां तें लवकर संपवून टाकावयाचें आहे!' 'लवकर संपवून टाकावयाचें आहे!' हे शब्द मला बॉम्बशेलप्रमाणें वाटले! मी मनाशीं म्हणालों, 'लवकर संपवावयाचें? कां म्हणून?' व त्यांच्या चेहऱ्याकडे बघितलें. पण तो चेहरा निर्विकार होता!—यापुढें त्यांनीं 'सावित्री'च्या कामाचा वेग वाढविला. तें काम संपवावयाची त्यांना घाई दिसली. खरोखरीं हें त्यांच्या नेहमींच्या स्वभावा-विरुद्ध होतें. त्यांची नेहमींची काम करण्याची व वागण्याची पद्धति इतकी विलक्षण शांत, संयमपूर्ण व धीरोदात्त असे कीं, ती पाहाणाराला वाटे ह्या पुरुषाला आपण अजर, अमर आहों असा आत्मविश्वास आहे, जणूं अनंत काळ त्यांच्या मुठींत आहे! आतांपर्यंतचें त्यांचें 'सावित्री' महाकाव्याचें लेखन असेंच धीर-गंभीर स्वैर गतीनें झालें होतें. किती का वेळ लागेना, हें काव्य निर्दोष करावयाची अरविन्दांची इच्छा स्पष्ट होती. त्यामुळें त्यांनीं आतां तें संपविण्याच्या बाबतींत चालविलेल्या घाईचें आम्हांला विचित्र गूढ वाटलें! एवढेंच नाहीं, तर ते जेव्हां आतां काव्य-पंक्ती रचून आम्हांला लिहावयाला सांगत, त्यांत नेहमीं-पेक्षां आवेश, जोष कमी झाल्यासारखा दिसला. उलट, कांहीं कांहीं वेळेला त्याच त्याच कल्पनांची व शब्दांची पुनरावृत्ति होऊन या विराट् महाकाव्यांत दोष उत्पन्न होतो कीं काय अशी भीति वाटे. ज्याच्या सरस्वतीचा प्रवाह आजपर्यंत ओसंडून वाहत असतांना नवनवीन कल्पना व शब्द यांच्या सौन्दर्याचीं कारंजीं उडत असत, त्याचीच सरस्वती आज बारक्या विरामचिह्नांशीं अडखळत आहे असें वाटूं लागलें! म्हणून 'हें असें कां? श्रीअरविन्दांना झालें आहे








तरी काय ? हे इतके गंभीर कां ? ' अशा शंकांचें माझ्या मनांत काहूर उठे. शेवटीं योजिल्याप्रमाणें जेव्हां दोन सर्ग संपले तेव्हां अरविन्दांना हायसें वाटून ते उद्गारले : 'संपलं बुवा, एकदांचं !' त्या वेळेला त्यांच्या चेहऱ्यावरील समाधानाचें स्मित जें झळकलें तें मला अजूनहि आठवत आहे.

"त्यानंतर हिंवाळा सुरू झाला आणि त्यांना लघवीचा त्रास पुन्हां सुरू झाला. तरी त्यांचीं नेहमींचीं कामें चालूंच होतीं. नोव्हेंबर १५ ला त्यांचा दर्शन-दिन होता. त्याआधीं दहा दिवस डॉ. सत्यव्रत सेन यांनीं श्रीअरविन्दांची प्रकृति पाहिली व डॉ. संन्यालप्रमाणेंच त्यांनीं आजाराचें निदान केलें. त्यावर शस्त्रक्रिया हा एकच उपाय होता. परंतु श्रीअरविंद व माताजी यांना हा उपाय पसंत नव्हता. याच सुमारास एकदां रात्रीं लघवी अडल्यासारखी झाली. मी घाबरून डॉ. सेन यांना जों घेऊन आलों, तों मध्यंतरीं लघवी मोकळी झाली होती. श्रीअरविंद मला हंसत म्हणाले, 'अरे एवढें घाबरायला काय झालं ? वेड लागलं कीं काय तुला ? या डॉक्टरांना उगीच त्रास दिलास !' मला माझ्या घाबरटपणाबद्दल लाज वाटली खरी—पण आनंदहि झाला.

"दर्शनदिनाच्या आदल्या दिवशीं एका ज्योतिष्याचें अरविन्दांना पत्र आलें. त्यांत अरविन्दांना कांहीं आजार होणार असून त्यांत त्यांच्या जीवाला अपाय आहे असें लिहिलें होतें. आम्हांला तें पत्र वाचून हंसूं लोटलें. अरविन्दांचें जीवन ज्योतिष्याच्या चौकटींत बसविणें म्हणजे मूर्खपणा होय अशी आमची खात्री होती. अरविन्दांनीं पत्रांत काय आहे, म्हणून विचारलें. पत्रांतील मजकुरांत तथ्य असणें शक्य आहे असें ते म्हणाले. हें त्यांचें विधान ऐकून आम्हांला कसेसेंच वाटलें !

"दर्शनदिन आला. अरविन्दांच्या आजारामुळें त्या दिवसाचा समारंभ तहकूब करावा कीं काय असाहि प्रश्न निघाला. पण दर्शनेच्छूंची निराशा व चिन्ता यांना तो एक विनाकारण विषय होईल तो टाळावा, म्हणून समारंभाच्या तहकुबीचा विचार सोडला. दर्शनविधि नेहमींप्रमाणेंच यथासांग शान्तपणें पार पडला. योगिराज आणि माताजी यांच्या दिव्यमंगल दर्शनसुखाचा हजारों भक्तगणांनीं अनुभव घेतला. पण लगेच दोन तासांनीं दुखण्यानें उग्र स्वरूप धारण केलें. चिंतेनें वातावरण ग्रस्त झालें. सुई घालून लघवी मोकळी करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. डॉ. संन्याल यांना तारेनें बोलावण्यांत आलें. सुईमुळें तात्काळ मुक्तता मिळाली हें खरें; परंतु त्याचा परिणाम कीं काय, त्यामुळें त्यांना ताप आला. यानंतर ते गुंगींत असत. आम्हांला वाटलें कीं, अरविन्दांनीं बाह्य जगांतून आपलें अंग काढून घेतलें असून ते अंतर्मुखतेच्या खोल डोहांत बुडी मारीत आहेत ! युरेमियामुळें अशी गुंगी (Coma) येते खरी; पण अरविन्दांची ही अवस्था डॉक्टरांनाहि नवीन होती. डॉ. संन्यालांचे उद्गार असे होते : 'दर तासा-दोन तासांनीं शुद्धीवर येऊन पाणी मागणें, वेळाची विचारपूस करणें—ही कांहीं विलक्षणच गुंगी आहे. माझ्या तरी आतांपर्यंतच्या अनुभवांत अशी विचित्र गुंगी आढळून आलेली नाहीं !'

"ही गुंगी कोणत्याहि प्रकारची असेना का, आमची मात्र चिंता वाढत होती. अरविन्द आपली अंतःशक्ति रोगप्रतिकारार्थ वापरतील अशी आम्हांला आशा होती. पण तसें चिह्न कांहीं दिसेना. अरविन्दांनीं गेलीं पन्नास वर्षें औषध असें घेतलें नव्हतें. त्यांचें शरीर इतकें निकोप आणि सुकुमार, त्यांची अंगकांति इतकी तेजःपुंज कीं, हा कोणी मानुषरूपधारी देवपुरुष वाटे. त्यांच्या या सुकुमार शरीरावर औषधांचा मारा, इंजेक्शनांचा अत्याचार करावयाचा दारुण प्रसंग आमच्यावर येऊन ठेपला होता !

"डिसेंबर १ ता. उगवली. डिसेंबर १ व २ या दिवशीं अरविन्दांच्या आश्रमांतील विद्यालयाचा वर्षदिन खेळ आणि नाटक यांनीं साजरा होत असतो, तसा तो या दिवशींहि साजरा झाला. अरविन्दांच्या अत्यवस्थेची वार्ता फारशी कोणाला लागूं दिली नव्हती. बाहेर नाटकाचा आस्वाद आश्रमीय घेत होते; तर अरविन्दांच्या खोलींत एक भीषण शोकान्तिका चालू होती. डिसेंबर २ च्या रात्रीं समारंभ संपल्याचें अरविन्दांना समजलें तेव्हां ते हंसून उद्गारले : 'होय. समारंभ, नाटक आतां संपलें !' पुन्हां ते गाढ अंतर्मुखतेंत मग्न झाले.

" डिसेंबर ४ चा संस्मरणीय दिवस उजाडला. अरविन्द जागृतावस्थेंत आले आणि त्यांनीं बसावयाची इच्छा दर्शविली. आम्ही 'नको' म्हणत असतां ते उठून चांगले खुर्चीवर बसले. ही त्यांची हालचाल पाहून आम्ही आश्चर्यानें व आनंदातिशयानें स्तंभित झालों. आम्हांला वाटलें, आमच्या प्रार्थनेला शेवटीं होकार मिळाला. आम्हीं चांचरत चांचरत त्यांना विचारलें, 'आजारांतुन मुक्त होण्याकरितां आपण आपलें सामर्थ्य पणाला लावणार ना?' 'नाहीं'. हें त्यांचें उत्तर ऐकून आम्हांला धक्का बसला. पुन्हां आम्हीं धीटपणानें विचारलें, 'कां नाहीं? आपण आपलें असामान्य सामर्थ्य जर वापरलें नाहीं तर या आजारांतून आपण बरें होणार कसे?' या आमच्या प्रश्नाला त्यांनीं गूढ उत्तर दिलें: 'तुम्हांला समजायचें नाहीं. विचारूं नका.' त्यानंतर एका तासानें ते पुन्हां आपल्या बिछान्यावर येऊन निजले. आणि आजाराचीं चिन्हें दुप्पट जोरानें बळावलीं. त्यांनीं पाणी मागून घेतलें, सर्वांवर आपली कारुण्यमय स्निग्ध दृष्टि फिरविली आणि जी शेवटीं अज्ञातांत बुडी मारली ती कायमचीच. या शेवटच्या घटकेपर्यंत आम्हांला शंकाहि आली नाहीं कीं, 'This was the day when Satyavan must die.'!"

## काश्मीरचें पुनरुत्थान

काश्मीरांत शेख अब्दुल्लांची कणखर सत्ता कार्य करावयास लागल्यापासून ज्या सुधारणा झाल्या आहेत व ज्या करावयाचा त्या राजवटीचा कृत-निश्चय आहे, त्या खरोखर क्रान्तिकारक म्हटल्या पाहिजेत. भारताच्या इतर 'राज्यां-(States) ना अधिक साधनसंपन्नता असूनहि जितकी प्रगति साधतां आलेली नाहीं तितकी या संकट-ग्रस्त भूभागांत साधल्यामुळें, ही कामगिरी तेथील कर्तृत्वशाली नेतृत्वामुळेंच साधली असें म्हणावें लागतें. या 'नव काश्मीर'चा परिचय करून देणारी लेखमाला 'टाईम्स ऑफ इन्डियां'त गेल्या महिन्यांत येऊन गेली. प्रस्तुत वृत्तपत्राचा लेखक श्रीनगरला जाऊन आलेला टाइम्सचा 'खास बातमीदार' आहे. त्यांतून पुढील महत्त्वाचा भाग पुढें संकलित केला आहे:

" शेख अब्दुल्लानीं केलेली जमिनीबाबतची सुधारणा खरोखरच धडाक्याची आणि नजरेंत भरणारी आहे. त्यानें जवळजवळ ४६,००० एकर जमीन ४२,००० (कसणाऱ्या) शेतकऱ्यांना वांटून दिली. बहुतेक प्रत्येक शेतकरी आतां आपल्या जमिनीच्या तुकड्याचा मालक होऊन जाईल. अशा तऱ्हेनें सुमारें ५,६२००० एकर जमीन पुढील एप्रिलपर्यंत अशीच वांटली जाईल. त्यानंतर कोणाजवळहि १८२ कालवे किंवा सुमारें २४ एकर जमीन यापेक्षां अधिक जमीन राहणार नाहीं. ज्यांची जमीन खालसा केली त्या जमीनदारांना सरकारनें भरपाई दिलेली नाहीं. संस्थानच्या तिजोरीला तें शक्यच नव्हतें.

" असें असून फारच थोडे लोक सरकारला दोष देत आहेत. कारण १८२ कालवे किंवा त्यापेक्षां कमी जमीन असणाऱ्या जमिनीच्या मालकांना जमिनीच्या राष्ट्रीयीकरणांतून वगळण्यांत आलें आहे. त्यामुळें जम्मू प्रांतांतील लहान जमीनदारांचा बचाव झाला व त्यांचीच संख्या तेथें अधिक होती.

" फळबागांना सरकारनें स्पर्श केला नाहीं. फळांची लागवड हा तेथें एक उद्योगधंदा मानला जातो. बहुतेक जहागीरदारांच्या १८२ कालव्यां-व्यतिरिक्त फळबागा असत. त्या कायम राहिल्यामुळें रोख पैसे हातीं येण्याचा मार्ग खुला राहिला. त्या-मुळें ९००० जमीनदारांनीं ही सुधारणा निमूटपणें मान्य केली. मध्यस्थ दलालांची भानगड न राहिल्या-मुळें कसणाऱ्या शेतकऱ्यांचाहि लाभच झालेला आहे. पूर्वीं त्याला उत्पन्नाचा अर्धा भाग जमीन-दाराला द्यावा लागे. आतां साऱ्याच्या रूपानें त्याला सरकारांत फक्त १/३० भागच द्यावा लागतो व तोहि पैशाच्या किंवा मालाच्या स्वरूपांत.

" सर्व क्षेत्रांतील दैन्य घालविण्याचा प्रयत्न चालूं आहे. शेतकऱ्यांचा कर्जबाजारीपणा काश्मीरांत शतकानुशतकें चालूं होता. काश्मीर सरकारनें फतवा काढून असें ठरविलें कीं, मूळ मुद्दलाच्या दीड-पट रक्कम एकमापी दिल्यास कर्जांतून मोकळीक होईल. दोन महिन्यांच्या अवधींत धनकोंनीं आपले दावे दाखल करावयाचे होते. कर्जमुक्तीसाठीं सात मंडळें स्थापून हें काम चालें. अध्यक्ष, न्यायाधीश

व दोन लोकनियुक्त सभासद अशा मंडळाच्या द्वारें निकाल होई. २००० पेक्षां कमी रकमेच्या दाव्यावर अपील नव्हतें. मोठ्या दाव्यांत फक्त एकच अपील करतां येई. जवळ जवळ ३५,००० दावे झाले. सुमारें ९५०० दाव्यांचा निकाल कोर्टातर्फे लागला व बाकीचे तडजोडीनें मिटले. १८ लाख रुपयांचा एकंदर व्यवहार ६,७५,००० एवढ्या रकमेवर मिटला. लहान हप्तेबंदीनें २५ ते ३० वर्षेपर्यंत हीं कर्जें फेडावयाचीं आहेत. अशा प्रकारें काश्मीरनें एक मोठा कलंक धुवून काढला आहे.

"शैक्षणिक क्षेत्रांतहि क्रान्तिकारक बदल झाले आहेत. नवीन अभ्यासक्रम तयार झाले आहेत. शिक्षकांना मूलोद्योगी शिक्षण दिलें जातें. डोग्रावंशीय महाराजांच्या राजवटींत काश्मीरांत फक्त ३ कॉलेजें होतीं. गेल्या तीन वर्षांत १२ कॉलेजें झालीं आहेत. नवीन काश्मीरी लिपि चालूं झाली असून सरकारतर्फे काश्मिरी लोकनृत्य, संगीत व सणवार यांसंबंधीं संशोधनपूर्वक पुस्तकेंहि प्रसिद्ध होत आहेत.

"प्रत्येकाच्या आवश्यक गरजा भागविणें हें सरकार आपलें कर्तव्य मानतें. अन्न, वस्त्र, मीठ, साखर आणि रॉकेल या पांच महत्त्वाच्या वस्तूंच्या खासगी व्यापाराला वाव नाहीं. सर्व आयात व वसुली सरकारच्या नांवें होते. वांटणीचीं कामें सहकारी संस्था करतात. बहुतेक सर्वत्र सहकारी संस्था आहेत. काश्मीरच्या खोऱ्यांतील प्रदेशांत ४२४ सहकारी संस्था असून जम्मू विभागांत ५३ आहेत. सर्व लोकांना मालाचा पुरवठा या सहकारी संस्थांतून होतो; माल नफा सभासदांमध्यें वांटला जातो.

"सरहद्दीवरील जमातींनीं आक्रमण केलें त्या वेळीं मीठ ४ रुपये शेर होतें, साखर व राकेल तर मिळतच नव्हतें. आतां मीठ ५॥ आणे शेर आहे. आणि सहकारी संस्थांतून कित्येक वेळां जेवढी जरूर असेल तेवढी साखर व रॉकेल मिळूं शकते.

"बगले व दलाल यांचा मागमूसहि लागूं न देण्याचा सरकारचा कृतनिश्चय आहे. सरकारी मालकीच्या केशराच्या बागा पूर्वीं कंत्राटदारांना लागवडीला मिळत. आतां अशी योजना होत आहे कीं, जिच्यामुळें प्रत्यक्ष लागवड करणाऱ्या माणसाला सरळपणें लागवडीचा परवाना मिळूं लागेल.

"शिंगाड्याची पैदास पूर्वीं लिलावानें होत असे. वुलर सरोवरांत हें पीक फार माजतें. पैसेवाले लोक लिलाव घेत व अर्धपोटीं मजुरांकडून काम करवून घेत. असे १५०० पाणबुडचे मजूर हे शिंगाडे गोळा करीत. आतां सरकारनें या पाणबुड्या भोयांनाच परवाने दिलेले आहेत. त्यामुळें त्या मजूरांची आर्थिक स्थिति सुधारली आहे.

"त्याप्रमाणेंच काश्मीरचे प्रसिद्ध कारागीरहि आतां बरेचसे सुखी झाले आहेत. सरकारनें संग्रहालयें स्थापिलीं आहेत व या धंद्याचें कांहीं प्रमाणांत राष्ट्रीयीकरण केलें आहे. श्रीनगरच्या संग्रहालयातर्फे या कारागिरांकडून माल खरेदी केला जातो व त्याबद्दल त्यांना योग्य प्रमाणांत मजूरी मिळते. वस्तूंचा दर्जा ठरवून टाकलेला आहे. बाजारापेक्षांहि केव्हां केव्हां येथें वस्तूंचे भाव अधिक असतात. पण सरकारचा असा आग्रह आहे कीं, यामुळेंच कारागिरांना व्यवस्थित पोटाला तरी मिळेल."

अर्थात् अजून खूप सुधारणा व्हावयाच्या बाकी आहेत. साक्षरतेचें प्रमाण फारच कमी आहे. तेंहि वाढावयाचें आहे. पण शेख अब्दुल्ला व त्यांचे सहकारी यांच्या प्रभावी नेतृत्वाखालीं काश्मीरचें जीवन लौकरच सुखी होईल अशी आशा वाटते.

## सोव्हिएत स्त्री-शास्त्रज्ञाचा महत्त्वाचा शोध

'सायन्स् ॲन्ड कल्चर' मासिकाच्या जूनच्या अंकांत सोव्हिएत प्रो. ओ. बी. लेपेशिन्स्काया या शास्त्रज्ञ स्त्रीनें जीवसृष्टीच्या मूलोत्पत्तीविषयीं ज्या महत्त्वाच्या गोष्टी उजेडांत आणल्या आहेत त्याबद्दल प्रो. जगत् जीवन घोष यांचा लेख आलेला आहे. 'जीवतत्त्वाची कोशात्मक मूलोत्पत्ति' या बाबतींतील तिची कामगिरी 'सोव्हिएत वूमन' नं. ५ (१९५०) यावरून संकलित करून दिलेली आहे. त्याचा सारांश असा:

"जीवकोशात्मक जीवोत्पत्ती (cell theory)चा सिद्धान्त श्लायडेन (Schleiden) व श्वान (Schwann) यांनीं १८३८ मध्यें मांडला. जिवंत द्रव्यजात केव्हांहि निराकार, रचनाहीन (structureless) नसते, तें cell किंवा जीवकोशाच्या किंवा पेशींच्या रूपांतच अस्तित्वांत असतें असा त्यांचा मुख्य सिद्धान्त आहे. यामुळें जीव व










वनस्पति यांतील भेद जाऊन त्यांचा एकाच नियमाखालीं विचार करतां येऊं लागला. पण सर्वांत प्रथम जीवांश उत्पन्न झाला तो कसा ? जर एका जीवकोशाचे विभाग होऊन त्यांतूनच पुढचा जीवकोश तयार होतो, तर मुळांतील पहिला जीवकोश कोणत्या त्यापूर्वीच्या जीवकोशांतून आला ? जर्मनींतील वनस्पतिशास्त्रज्ञ तत्त्ववेत्ता रुडॉल्फ व्हिर्चो ( Virchow ) यानें ही गोष्ट पुन्हां एकदां निदर्शनास आणली त्यामुळें जीवतत्त्व सर्वप्रथम सहज प्रेरणेनें ( spontaneously ) किंवा स्वयंचेतनेनें ( vitalistically ) उत्पन्न झालें असें मानणें भाग पडलें.

परंतु प्रो. ओ. बी. लेपेशिन्स्काया यांनीं ३० वर्षांच्या दीर्घ निरीक्षणानंतर या बाबतींत अगदीं नवीन उपपत्ति सुचविली आहे. त्यांच्या मताप्रमाणे जीवकोशासारखी संकीर्ण स्वरूपाची एकरूप वस्तु अशी एकदम प्रकट होणें अशक्य आहे. फार प्राचीन काळीं केव्हां तरी जीवकोशाच्या पूर्वींचीं जीवतत्त्वाचीं रूपें अस्तित्वांत असलीं पाहिजेत व तीं जिवंत प्रोटीन्स् किंवा प्रोटोप्लाझम् यांच्या स्वरूपांतच असावींत. हीं आदिकालीन जीवात्म रूपें जिवंत जीवकोशांच्या बाहेरच एकाद्या खास परिस्थितींत वाढत असलीं पाहिजेत. मात्र तशी परिस्थिति आजला कोठेंहि आढळणार नाहीं. उत्क्रान्तीच्या प्रवाहांत जीवकोशाचे हे मौलिक विभाग एकरूप होऊन त्यांतून आजचा जीवकोश ( Cell ) तयार झाल्यामुळें हीं जिवंत प्रोटीन्स् नष्ट झालीं. त्यांचें कार्य संपलें. उत्क्रान्तीच्या दृष्टीनें विचार करतां अशी शक्यता मानणें अधिक संभवनीय ठरतें.

प्रो. लेपेशिन्स्काया यांनीं आपले प्रयोग कोंबडीच्या अंड्यांवर केले. जुन्या बहुमान्य सिद्धान्ताप्रमाणें अंड्यांतील पिवळा बलक ( yolk ) म्हणजे केवळ अंड्यांतील जीवाला पोषक अशा द्रव्याचा सांठा होय. गर्भरूप 'डिस्क' ( embroyonic disc ) मध्येंच केवळ जीवाणु किंवा जीवकोश असतात व त्यांच्या विभागणीनें प्राण्याची घडण होते. परंतु प्रो. लेपेशिन्स्काया यांना असें आढळलें कीं, कोठल्याहि संयोग–( structure )–विरहित असलेल्या या बलकांत 'न्यूक्लस्' मध्यें किंवा अणुमध्यभागीं असणाऱ्या द्रव्यासारखे पदार्थ आहेत. त्यांमध्येंच गर्भस्थ 'डिस्क'च्या बाहेरच स्वतंत्रपणें वाढलेले जीवकोशहि आहेत. प्रो. लेपेशिन्स्काया यांनीं असेंहि दाखविलें कीं, ही गर्भस्थ 'डिस्क' काढून टाकून मग उरलेल्या बलकांतहि असेच जीवकोश तयार होतात. अशा विविध प्रयोगांनंतर प्रो. लेपेशिन्स्काया यांचें असें निश्चित मत झालें आहे कीं, जीवकोश हे मूलतःच सुघटित नसून ते असंघटित, रचना-संयोगहीन अशा प्रोटोप्लाझम्-युक्त द्रव्यांतूनच तयार होत असले पाहिजेत. त्यांनीं सूक्ष्मछायाचित्रणाच्या द्वारें असेंहि दाखविलें आहे कीं, पिवळे गोलाकृति भाग गर्भाच्या रक्तवाहिन्या बनतात आणि इतर गोलाकृति भागांचा रंग बदलून त्यांतून रक्त-पेशी ( blood cells ) तयार होतात. अशा प्रकारें शेंकडों प्रयोग केल्यावरच प्रो. लेपेशिन्स्काया यांनीं आपलें मत निश्चित केलेलें आहे.

## विज्ञानाच्या जगांतील घडामोडी

'सायन्स् डायजेस्ट'च्या मार्चच्या अंकांत पुढील नवीन शास्त्रीय गोष्टींचा समावेश केलेला आहे :

( अ ) १ लक्ष ग्रहगोलांवर सजीव सृष्टि असावी असा तर्क केंब्रिजच्या गणितज्ञांनीं केला आहे व याला प्रो. हॅरोल्ड सी. यूरी या अमेरिकन भौतिक शास्त्रज्ञाचा पाठिंबा आहे. डॉ. जेरार्ड पी. क्यूइपर यांनीं गतवर्षीं हेंच म्हणणें मांडलें होतें.

मंगळावर सजीव सृष्टि आहे असें क्यूइपरचें म्हणणें आहे. प्रो. यूरी म्हणतात कीं, तेथें वनस्पति-सृष्टि असावी असें निश्चित वाटण्याइतका पुरावा आहे. जीवसृष्टि एकदम उत्पन्न होत असते. आपल्या सूर्यकेंद्रित ग्रहमालेसारख्याच अनेक शत-शत-कोटी ( १ वर १५ शून्यें एवढ्या संख्येच्या ) ग्रहमाला अवकाशांत आहेत ! तेव्हां आपल्या पृथ्वीवरील जीवसृष्टीसारखीच सृष्टि त्या ग्रहमालांतील पृथ्वीसदृश गोलांवर असणें अगदीं शक्य आहे. आणि जर कधींकाळीं त्यांच्याबद्दल आपणाला नक्की माहिती लागली, तर त्यांनाहि त्याच वेळीं आपली नक्की माहिती लागलेली असेल, असें अनुमान सहज काढतां येतें.

( ब ) शास्त्रीय जगांतील साध्य झालेल्या सर्वांत



अनुक्रमणिका








महत्त्वाच्या १० गोष्टी पुढीलप्रमाणें सांगतां येतील असें वाट्सन डेव्हिस यांचें म्हणणें आहे: (१) हायड्रोजन सुपरबॉम्बची तयारी. (२) रेडिओ-कार्बन ॲटॉमिक् 'कॅलेंडर' च्या साह्यानें पुराणवस्तूंचें संशोधन करून २५,००० वर्षांपूर्वीच्या वस्तूंचा कालक्रम नक्की करतां आला. (३) अमेरिकेच्या हवामानखात्यातर्फे हवामानविषयक पाक्षिक भविष्यें जवळजवळ अचूक ३० दिवस आगाऊ वर्तविलीं जातात. (४) रंगीत टेलिव्हिजनला अधिकृत मान्यता मिळून लोकप्रिय रेडिओकेंद्रांवर त्याचा उपयोग होत आहे. (५) भावनावशता, कृतिशीलतेचा दाब (Pressure of activity), पुंस्त्व, अधिकारलालसा, भावनात्मक स्थिरता, समाजप्रियता आणि चिंतनप्रधानता या सात मानसिक गोष्टींचें मोजमाप शक्य झालें आहे. (६) रक्ताच्या पृथक्करणाची नवी पद्धत सांपडून रक्तांतील रक्तपेशी, शुभ्रपेशी, लघुग्रंथि (Platelets) आणि महत्त्वाचे प्लाझ्माविषयक आंकडे ६ तासाच्या आंत समजूं शकतात. (७) अणुविच्छेदनाच्या शक्तीच्या आघातानें अणुस्फोट करून दोन नवीन मूलतत्त्वें, ९७ वें बर्केलिअम् आणि ९८ वें कॅलिफोर्निअम् हीं सांपडलीं आहेत. (८) सूर्याच्या ग्रहमालेला सर्वांत जवळ असलेला तारा प्राक्झिमा सेन्टॉरी याच्या अंगांतून वारंवार प्रचंड तेजःस्फोट होतात असा शोध लागला आहे. (९) क्विबेकमध्यें उल्कापातामुळें पडलेला मोठा खड्डा सांपडला आहे. पॅसिफिक महासागराच्या तळावर अत्युच्च पर्वतराजि असल्याचा शोध लागला आहे. (१०) कॉर्टिझोन आणि ACTH या औषधांचा संधिवातसदृश आणि इतर रोगांत यशस्वी उपयोग झाल्याचें दिसतें.

## बिलिअर्ड्स् खेळाची कुळकथा

'कॅराव्हान्' नामक लोकप्रिय नियतकालिकाच्या मे महिन्याच्या अंकांत हार्नी डे (Harney Day) यांच्या 'बिलिअर्ड्सचीं १५० वर्षें' नांवाचा लेख आला आहे. त्यांतून पुढील माहिती संकलित केली आहे:

शेक्सपिअरच्या 'ॲंटनी ॲन्ड क्लिओपाट्रा' नाटकांत या खेळाचा उल्लेख आहे. ऐतिहासिक काळांत तो प्रथम इंग्लंडांतच माहीत होता.

प्रथम हा खेळ सपाट जमिनीवर खेळत असत. पुढें ठराविक जागीं खेळ खेळण्यासाठीं भोंवतीं कठडा उभा करूं लागले. पण मग शेवटीं तो टेबलावर खेळावयास सुरुवात झाली. स्पॅनिअर्ड लोकांनीं इतर गोष्टींप्रमाणेंच हा खेळहि अमेरिकेंत नेला आणि तेथें त्यांत खूपच फेरफार झाले.

१७९९ सालीं जॉन थर्स्टन यानें या खेळाला फार व्यवस्थित स्वरूप दिलें व आजचा खेळ याच स्वरूपांत खेळला जातो. हा गृहस्थ टेबल-खुर्च्यांचा कारखानदार होता. त्यानें प्रथम रबरी आवरणाचें टेबल या खेळासाठीं तयार केलें. १८३४ सालीं स्लेट (पाटीच्या) दगडाचा पत्रा बसवलेलें टेबल त्यानें तयार केलें व आज तीच रीत सर्वत्र सोयीस्कर मानली जाते.

१८ व्या शतकांत व १९ व्या शतकाच्या पहिल्या भागांत बिलिअर्ड्सच्या चेंडूवर आघात करण्यासाठीं राजदंडासारख्या काठ्या वापरल्या जात. १८०७ मध्यें एका फ्रेंच खेळाडूनें त्या काठीला चामड्याचें टोंक बसविलें. ही सुधारणा जॉन थर्स्टनच्या लक्षांत अचूक भरली. त्यानें या काठीची लांबी व जाडी नक्की करून तिला प्रमाणबद्धता आणली.

बिलिअर्ड्सचे चेंडू पूर्वीं हस्तिदंताचे तयार करीत. हत्तिणीच्या एका दातांत तीन चेंडू बसत. पण त्यांचा आकार व वजन सर्वत्र सारखें नसल्यामुळें आतां 'कॉम्पोझिशन'—(रासायनिक रीत्या तयार केलेले)—चेंडूच सर्वत्र वापरले जातात. १९ व्या शतकाच्या अखेरीस दरवर्षाला १२,००० हत्ती या चेंडूंसाठीं मारले जात! आणि त्याबरोबर बरीचशीं माणसेंहि कामाला येत!

व्हिक्टोरिया राणी व सातवे एडवर्ड राजे यांच्या अमदानींत दरेक संपन्न व्यापाऱ्याच्या घरीं एक स्वतंत्र खोली बिलिअर्ड्ससाठीं सुसज्ज तयार असे. अर्थातच बिलिअर्ड्सबरोबर इतर हौशीचे प्रकारहि तेथें शिरले. स्त्रियांपासून ही खोली दूर असे आणि बरेचसे नाईलबुद्धे पुरुष तेथें विसांवा मिळवीत!

---












# 'नवभारत' लेख-सूचि

## वर्ष ४ थें : ऑक्टोबर १९५० ते सप्टेंबर १९५१





अनुक्रमणिका







मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

# लेख-सूचि ( ऑक्टोबर १९५० ते सप्टेंबर १९५१ )












## क वि ता, ग द्य का व्य





अनुक्रमणिका






## लेख-सूचि ( ऑक्टोबर १९५० ते सप्टेंबर १९५१ )


















नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

## लेख-सूचि ( ऑक्टोबर १९५० ते सप्टेंबर १९५१ )



———












# ‘नवभारत’ लेखक--सूचि

**वर्ष ४ थें : ऑक्टोबर १९५० ते सप्टेंबर १९५१**

[ पहिला आंकडा अंकाचा अनुक्रम; दुसरा आंकडा पानांचा ]











## लेखक-सूचि ( ऑक्टोबर १९५० ते सप्टेंबर १९५१ )

Regd. No. B. 5177

आपणांस हव्या असलेल्या
कोणत्याहि पुस्तकाकरितां

तसेंच

# नवजीवन कार्यालय,

अहमदाबाद




यांच्या इंग्रजी, मराठी, हिंदी
आणि गुजराती प्रकाशनासाठीं

## प्रथम आम्हांलाच भेटा अगर लिहा



## सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला,

टिळक रोड, पुणें २

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष